ॐ श्रीगणेशाय नमः । श्रीनरनारायण वृत्त सांगती । कृतयुग सात्त्विक जगतीं । त्रेता राजस द्वापार तामस असती । कली अन्तीं तमोमय ।।१।। कलियुगांत सर्व नाश पावत । पापरूपधर तें असत । तेथ कुठला विप्रधर्म नांदत । रोगभय सतत त्यांत ।।२।। क्षुधेंचें भय अनावृष्टीचें भय । देशांचा होत विपर्याय । लोक अधार्मिक अनाचारमय । महाकोपिष्ट लोभयुत ।।३।। सदैव बोलती अनृत । त्यांची प्रजा दुष्ट असत । अरिष्ट दुरितांनी पीडित । दुराचारी जन कलियुगीं ।।४।। ब्राह्मण कर्मभ्रष्ट होती । त्यांच्या कर्मदोषें प्रजेस भीती । वेदांचें अध्ययन न करिती । यज्ञयाग न आचरती ।।५।। अल्पबुद्धी वेद म्हणती । शूद्रांपुढें विप्र दुर्मति । शूद्र मंत्र योगी संबंधित होती । ब्राह्मणांसह कलियुगीं ।।६।। ब्राह्मणासहित शयन आसन । तैसेचि करिती भोजन । शुद्रांच्या हाती राज्यासन । ब्राह्मणांसी ते पीडिती ।।७।। राजे ब्रह्महत्या करिती । पशुहत्याही दुष्ट चित्तीं । स्नान होम जप दानादि न करिती । अर्चनही द्विजवर्ग ।।८।। गणेशाची ब्राह्मणांची । वेद शास्त्रांची पुराणांची । निंदा करिती दैवतांची । वेदबाह्य कर्में करिती जन ।।९।। अनाधार कर्में करिती । स्वधर्मी तयांसी नसे रती । शीलहीन विप्र असती । पाखंडी भीरू अनृतमय ।।१०।। सर्व वर्ण याचक होतील । जनपद होणार अट्टशुल । चतुष्पथीं शिवशूल । केशशूल प्रमदाजन ।।११।। शुक्लदंत अक्षजित । काषायवसन तैसे मुंडित । ब्राह्मणांचा धर्म आचरित । शूद्रवर्ण कलियुगीं ।।१२।। अन्नचोर जन असतील । मर्यादातिक्रमण करतील । चोरांचे चोर उपजतील । हर्त्यांचे हर्ते जगांत ।।१३।। दुःखप्राचुर्ययुत अल्पायू जन । शिश्नोदर परायण । द्यूतमद्यादि संसक्त जीवन । परस्त्री लंपट ते असती ।।१४।। कापालिक तैंसे यतिजन । यती गृहभेधी विद्वज्जन । वेदांचा विक्रय करिती ब्राह्मण । तीर्थ विक्रयही ते करिती ।।१५।। आसनस्थ द्विजांसी

पाहून । अल्पबुद्धि उभे न राहती विनम्रमन । विप्रांसी ताडिती शूद्रजन । राजे राजधर्म न पाळिती ।।१६।। शूद्र वेदाध्ययनीं तत्पर । उच्चासनीं बसतील थोर । ब्राह्मण त्यांच्या सेवापर । दारांत उभे राहतील ।।१७।। शूद्र राजांचा बहुमान । उपायनादी त्यांस देऊन । द्विज करतील स्तुतिगान । शूद्र धर्म सांगतील ।।१८।। बुद्धिशाली शूद्र होतील । ब्राह्मणांसी ते शिकवतील । वेदवादविचारज्ञ बहुल । वेद विकतील कलियुगीं ।।१९।। तप यज्ञफळें सुकर्मे विकिती । ऐसी जनांची हीनमती । आपुला पति सोडून रमती । परपुरूषासवें कुलजा ।।२०।। पतिद्रोहपरायण । कुलस्त्रिया भोगितील रमण । यती शेकडों हजारों दुर्गुण । मद्य स्त्री संग संसक्त ।।२१।। वाममार्गी पाशुपत । सांख्य पंचवाहक जगांत । ब्राह्मण तैसे क्षत्रिय कलियुगांत । ज्ञानमार्ग नष्ट होय ।।२२।। लोक निष्क्रिय होतील । कीटक मूषक सर्व सबल । मानवांसी ते भिववतील । ब्राह्मण कुळीं अवतार घेती ।।२३।। पूर्वी दक्षाच्या यज्ञांत । दधीचि शापदग्ध असत । गौतमाच्या शापें संसक्त । वाममार्गात भ्रष्ट जन ।।२४।। दक्षयज्ञीं सर्व वर्ण शापित । अन्य जातीत ते जन्मत । फळें दाखवून मोहवित । जनांची बुद्धी भ्रष्ट करिती ।।२५।। तमोगुणें आविष्ट चित्त । बोके संन्यासी अधम दुर्वृत्त । बौद्ध मायाधर असत । विष्णु पाखंड पोषक ।।२६।। दधीचीच्या शापें करित । विष्णु साहाय्य त्या जनाप्रत । कर्म मार्ग छेदून टाकित । भ्रष्टाचारी करी जन ।।२७।। विष्णु बौद्धावतार घेऊन । युगधर्म ऐसा पसरवून । अतज्ज्ञ त्यास शरण जाऊन । बौद्धमायेस आपुली म्हणती ।।२८।। दहा हजार वर्षे होता जात । विष्णु सोडून धरातल वैकुंठाप्रत । सहस्त्र वर्षे स्थिर वाहत । दिव्य भागीरथी नदी ।।२९।। ग्रामदेव त्याच्या अर्ध समयांत । स्वर्गी महामुने परतत । स्वधर्मविधिसंयुक्त । तेवढेंच कर्म देवभोग्य

।।३०।। जें जें विपरीत कर्म घडत । तें तें आसुरभाव युक्त । आसुर भाव कलियुगीं पसरत । देव जाती निजधामासी ।।३१।। आसुर स्वभावें युक्त जन । जेव्हां करिती तीर्थाटन । तेव्हां तयांसी पाहून । तीर्थदेवता लुप्त होती ।।३२।। तेव्हां त्या त्या तीर्थांत । तैसेचि त्या त्या देवमूर्तित । प्रवेश करून कर्मफळें भोगित । असुर गण कलियुगीं ।।३३।। तीर्थें गुप्तभावें वसत । देवता मंदिर उपवासयुत । महासुरासी दैवसहित । पाहून तीर्थ देव गुप्त होती ।।३४।। आसुरभावें कर्म करिती । ऐसे विप्र भ्रष्ट असती । दोषपूर्ण ते तामसमति । ऐसी स्थिती कलियुगीं ।।३५।। क्रियारूपा महाशक्ति । क्रियाफळ दाता गणपति । सुरासुरांसी सिद्धिप्रद निश्चिती । देव गजानन गणराज ।।३६।। तीही आपुलें महिमान । ठेवी गुप्त जतन करून । धर्माचे चार पाय महान । तप शौच दया सत्य ।।३७।। हे चार पाय नष्ट होतीं । क्रमानें युगायुगांत निश्चिती । कृतयुगी चारही वर्तती । दया नष्ट त्रेतायुगीं ।।३८।। तप नष्ट होय द्वापारांत । कलियुग येता आचार संपत । सत्यरूप पाय परी उरत । धर्माचा हें रहस्य जाणा ।।३९।। त्या सत्याच्या आधारें करित । जन सारे व्यवहार जगांत । द्वापाराचा संध्यांश उलटत । तेव्हा प्रभावी कली होय ।।४०।। बहुल अनृतभावें हरण करित । सत्याचें कलिप्रभाव युक्त । नंतर क्रमानें ओढवत । विनाश सत्याचा कलियुगीं ।।४१।। लोक अन्नादि विवर्जित । होतील दुःखसंयुक्त । ग्रामादी सोडून समस्त । वनीं जाऊन राहतील ।।४२।। परस्परांसी क्षुधाग्रस्त । भक्षितील जन समस्त । सत्यहीन धरित्री होत । महामते कलियुगीं ।।४३।। षोडश अब्दपर आयू असत । पंच वर्ष समन्वित । नारी गर्भवती होत । कलियुगांत विशेषें ।।४४।। ऐशापरी आसुरभावें जित । जेव्हां सर्व जग होत । तेव्हां देवता मुनी स्तवित । गणेशासी आर्तभावें ।।४५।।

सुरांच्या हितार्थ अवतरेल । ढुंढी तेव्हां अधर्म नाशील । धर्माची प्रतिष्ठापना अमल । धूम्रवर्ण नामें करील ।।४६।। धर्माचें प्रवर्तन करुन । नंतर पावेल अन्तर्धान । तेव्हां पुनरपी कृतयुगागमन । संध्यांश युग क्रमांत ।।४७।। ऐसें युगप्रमाण कीर्तित । युगधर्म तैसाचि प्रख्यात । मायामय हें क्रमयुक्त । समस्त तूं जाणावें ।।४८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते कलियुगवर्णनं नाम सप्तदशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सतरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण पुढें सांगती । वर्णाश्रमांची महती । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य जगतीं । शूद्र हे चार वर्ण ।।१।। ब्रह्मचर्य गार्हस्थ असत । वानप्रस्थ संन्यास आश्रम वेदोक्त । ब्राह्मणांसी चार आश्रम संमत । क्षत्रिय वैश्यांसी संन्यास नसे ।।२।। शूद्रांसीं गार्हस्थ हाच आश्रम । अंत्यजांसी तोच परम । जाणावें विबुधीं वेदवचन । सर्वकाळ प्राचीन हें ।।३।। ब्राह्मण कुळांत जन्मत । पाचव्या सातव्या आठव्या वर्षांत । मौजीबंधन होत जात । गुरुसन्निध कृतोपवीती ।।४।। तेथ होऊन विनयान्वित । वेदादिक सर्व अभ्यासित । ब्रह्मचर्यव्रतें राहत । सायंप्रातर्भिक्षा मागे ।।५।। गायत्रीचा जप करित । प्रातःकाळीं ब्रह्मरूप जी असत । मध्यान्हीं रुद्ररूप घेत । सायंकाळी विष्णुरूप ।।६।। भूर्भुवस्वः म्हणून । करावें नियमपूर्ण आचमन । स्वः अन्तीं म्हणून । इंद्रियन्यासादी करावे ।।७।। तर्जनी आदी अंगुलींनी मुख स्पर्श । तर्जनी अंगुष्ठानें नासिक स्पर्श । अंगुष्ठ अनामिकेनें चक्षुस्पर्श । कनिष्ठिकेनें कर्ण स्पर्श ।।८।। दोन अंगुष्ठांनी स्पर्श नाभीस । करतलें तैसा हृदयास । सर्व अंगुलींनी भ्रूमध्यास । अंगुष्ठाग्रें शिखा स्पर्श ।।९।।

सर्वांगुलीनीं बाहूस । स्पर्श करोनी करावे न्यास । आपापल्या शाखोक्त नामास । उच्चारुन आचमन करावें ।।१०।। वैदिक मंत्रें संध्या करुन। प्रणवादींचें न्यास उच्चारून । व्याहृती षडंग अक्षर उद्भव म्हणून । करावे न्यास गायत्रीचे ।।११।। नंतर आचमन करावें । सूर्यश्च इति मंत्रें प्रात:काली बरवें । आप: पुनन्तु माध्यान्हीं म्हणावे । सायंकाळी अग्निश्च आदि मंत्र ।।१२।। नंतर करावें मार्जन । एकोणतीस वेळां मोजून । तदनंतर अर्घ्यदान । उपस्थानादि आचरावें ।।१३।। गायत्रीचा शापमोक्ष उच्चारून । तदनंतर ध्यान जप पावन । पंचकाल शतसंख्या प्रमाण । ब्रह्मचारी असे त्यानें ।।१४।। गायत्रीचा जप अष्टोतर शत । गृहस्थें करावा एकाग्र चित्त । त्या समयीं रहावें मौन व्रत । ऐसा नियम शास्त्रांत असे ।।१५।। वानप्रस्थें एक सहस्त्र जप करावा । त्रिकाळ संध्येचा नियम राखावा । ब्राह्मणांनी धर्म पाळावा । गायत्री जपांत क्रम राखून ।।१६।। त्रिपाद गायत्री ओंकार संयुत । जपावी तिचा क्रम सांगत । प्रथम प्रणव उच्चारून पुनित । नंतर म्हणाव्या व्याहृती ।।१७।। भूर्भुव: स्व: ह्या व्याहृती । तदनंतर प्रणवाची उक्ती । ह्यानंतर गायत्री म्हणती । ओंकार उच्चारती पुनरपि ।।१८।। संन्यासी जनांनी जप करावा । चतुष्पाद गायत्रीचा आश्रय घ्यावा । आपापल्या आश्रमीचा पाळावा । श्रुतिधर्म प्रत्येकानें ।।१९।। ब्रह्मचारी भिक्षा मागत । स्वगोत्रादि गृहस्थांच्या घरांत । विधानपूर्वक गुरूस समर्पित । जी जी भिक्षा जमविली ती ।।२०।। व्रती विप्र भिक्षा मागत । तेव्हा भवत् शब्द प्रथम उच्चारित । क्षत्रिय उच्चारितो मध्यांत । भवत् शब्द वैश्य अन्तीं म्हणे ।।२१।। जरी संपूर्ण भिक्षा गुरु घेत । तरी उपवास करावा श्रद्धायुक्त । ब्रह्मचाऱ्यांचें ऐसें व्रत । गुरु देईल तेवढें खावें ।।२२।। स्वल्प अथवा परिपूर्ण देत । भिक्षा जरी गुरु शिष्यास परत । तरी ती स्वीकारावी भक्तियुक्त । विनीतभावें

शिष्यानें ।।२३।। पालाश दंड संयुक्त । सायंप्रातः अग्निव्रत । समिधांची आहुती यज्ञांत । विधिपूर्वक त्यानें द्यावी ।।२४।। नखें केस न कापावे । धार्मिक नियम पाळावे । गुरुसी दैवत मानावें । सर्व भावें शिष्यानें ।।२५।। गुरूंच्या स्त्री पुत्रासी सेवित । गुरुसमान त्यास मानत । ऐशा शिष्यें एकांतात । गुरु पत्नीसह न रहावें ।।२६।। स्त्रियांशी संभाषण न करावें । स्त्रियांचें गायनादी न ऐकावें । आपल्या वीर्यासी जपावें । ब्रह्मचाऱ्यानें विशेषें ।।२७।। जरी स्वप्नांत वीर्यस्खलन । झालें तर करावें स्नान । एकशें आठ गायत्री जपून । प्रायःश्चित्त करावें ।।२८।। गुरुनें जें जें शिकविलें । त्याचें अध्ययन पाहिजे केलें । विद्या परायणें शिष्यें पाहिजे राखिले । मौन गुरुच्या पुढ्यांत ।।२९।। ऐसा नानाविध लक्षणेंयुत । ब्रह्मचारी वेदाध्ययनीं रत । बारा अथवा सोळा वर्षांत । अध्ययन पूर्ण करावें ।।३०।। अथवा इच्छेप्रमाणें आचरत । ब्रह्मचर्यव्रत निष्ठावंत । वेदादि कंठस्थ करित । तदनंतर देई गुरु दक्षिणा ।।३१।। जरी मन असेल विषयसंयुक्त । तरी तो गृहास्थाश्रम स्वीकारित । अन्यथा जात वनांत । संन्यासव्रता घेऊन ।।३२।। अन्यथा सदा ब्रह्मचर्यांत । द्विजोत्तम राही जगांत । जैसी ज्याची चित्तशुद्धी असत । तैसे त्यानें आचरावें ।।३३।। जें जें केलें अध्ययन । जगतीं योगादिक ज्ञान । तें तें आचरणांत आणून । धर्म नियम पाळावे ।।३४।। ऐसें हे ब्रह्मचर्य व्रत संक्षेपांत । महामुने सांगितले तुजप्रत । तें ऐकतां पुण्यप्रद होत । लोकोपकारी सर्वदा ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते ब्रह्मचर्याश्रमवर्णनं नामाष्टादशोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अठरांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण आश्रमधर्म वर्णित । पितृमातृपरायण द्विज राहत । क्षौर करोनी स्वगृहांत । द्विजदेवपरायण ।।१।। आपणाहून जी वयें लहान । कुलशीलादींनी संपन्न । सर्व अवयवयुक्त शोभन । ऐशी वधू वरावी ।।२।। संतानार्थ ऋतुगमन करित । गृहस्थ जो कलत्रवंत । देव विप्र अतिथींचे स्वागत । गृहस्थाश्रमीं करितसे ।।३।। यजन याजन दान अध्ययन । प्रतिग्रह तैसे अध्यापन । ही सहा कर्में पावन । गृहस्थाश्रीं करितसे ।।४।। स्नानसंध्या जप होम । आतिथ्य तैसें देवतार्चन क्षेम । स्वाध्याय वैश्वदेवादी आश्रमधर्म । गृहस्थें नित्य आचरावे ।।५।। चतुर्थीव्रत आद्य पावन । तैसीच अन्य व्रतें शोभन । जो चतुर्थी व्रतहीन । त्यास अधिकार नसे अन्य व्रतांत ।।६।। तो सदा शौची चतुष्पदविवर्जित । शुक्लचतुर्थीस जो अन्न जेवित । मांसाहार वा करित । तो प्राणी जाय नरकांत ।।७।। अग्निहोम नित्य आचरावें । श्राद्धादिक सर्व करावें । दयायुक्त होऊन रहावें । गृहामाजीं आनंदित ।।८।। अभक्षभक्षण न करावें । नियम सर्वही पाळावे । पितृदेवमुनितर्पण करावें । गृहस्थानें निष्ठेनें ।।९।। आचारशुचितायुक्त । पंचयज्ञादिक नित्य करित । जे प्रकीर्तित शास्त्रांत । आपुल्या सत्तेप्रमाणें ।।१०।। गृहस्थाश्रमी जो असत । त्याचा धर्म आता सांगत । अर्ध्यानें पुत्रांदीस पालन करित । चतुर्थांश सुहृदां देई ।।११।। चतुर्थांशें देवादींस तोषवित । आपुल्या आयुष्यानें गृहस्थ जगांत । ऐसे नानाविध धर्म आचरत । वृद्धापकाळीं वनीं जाई ।।१२।। आपुल्या स्त्रीस पुत्रासमीप सोडून । अथवा आपुल्या सवें घेऊन । धर्मार्थ आश्रया शरण वन । तपस्वी मग करीतसे ।।१३।। पुत्रयुक्त असेल वा पुत्रहीन । तप आचरी वनांत जाऊन । फळकंदादींचें भक्षण करुन । वन्य विधीनें अग्निहोत्र करी ।।१४।। अतिथींचें यथाशक्ति पूजन । नाना तपांचें आचरण पावन ।

पत्नीसमीप संस्थित । मैथूनसुख न भोगावें ।।१५।। मनानें ही तें न भोगावें । वानप्रस्थानें स्वभावें । वायुभक्षणादिक करावें । वायुसाधन ही वनीं ।।१६।। प्राणायाम करुन । पंचाग्नींचें ग्रीष्मीं साधन। हेमंती जळांत निवसत । वर्षाऋतूंत आकाशवासीं ।।१७।। संकटातही राही वनांत । वानप्रस्थ न जाय ग्रामांत । प्रवेशही वर्ज्य मानावा त्यांत । महात्म्या वानप्रस्थानें ।।१८।। ऐसें नानाविध धर्माचरण । वानप्रस्थ करी धर्मप्रमाण । आयुष्याचे तीन भाग सरता क्षण । सन्यांस घ्यावा तयानें ।।१९।। तेव्हा स्त्रीनें आज्ञा द्यावी त्यास । आपण शोषवावे तपें देहास । मरणावधी करुन सायास । परी पतीसी न थांबवावें ।।२०।। अग्निहोत्र स्वदेहीं आचरत । एकाग्र होई स्वात्म्यांत । निस्पृह होऊन संचार करित । पृथ्वीवरी सर्वत्र तो ।।२१।। मी ब्रह्मा ह्या भावें होत । संन्यासी चित्तभूमि वर्जित । योगी योगभूमिभावें फिरत । कर्मादिन्यास संयुक्त ।।२२।। एक रात्र एका ग्रामांत । न्यास परायण तो राहत । द्वंद्वभाव सोडून मागत । भिक्षा करपात्री संन्यासी ।।२३।। हातांची ओंजळ जोडून । भिक्षा मागून ग्रास भोजन । करिता अश्वमेधादिकाहून । अधिक पुण्य तया लाभे ।।२४।। तीर्थक्षेत्रादि भूमींत । रहावें त्यानें चातुर्मास्यांत । जितेंद्रियें जितप्राणें सर्व कर्मांत । नि:संगपणें वर्तावें ।।२५।। अहिंसा परम धर्म संमत । संन्याश्यांचा अभिमत । तृणादींचें छेदन न करित । संन्यासधर्मानुसार ।।२६।। त्रिदंडी जो संन्यासी असत । कुटीचक असें नाम तयाप्रत । त्याचा आचार विधि सांगत । मुनिसत्तमा ऐक तूं ।।२७।। स्वधर्माचरण प्रथम नित्य देहदंड । मौन धारण दुसरा वाचामय दंड । तिसरा तो मनोदंड । सर्वत्र रसहीन करावें मन ।।२८।। देहमयी कुटी चालवावी । योग्यानें-बिंबभावें बरवी । ब्रह्मांत ब्रह्मभूत व्हावी । वृत्ति तेव्हां कुटीचक म्हणती ।।२९।। त्यानंतर बहूदक योगी असत । द्विदंडी

तो जगांत । त्यासी देहदंड नसत । स्वेच्छाचारी तो विशेषें ।।३०।। एका विहिरीतील पाणी प्राशिती । अनेक नर आपुल्या हातीं । त्यांच्या दोषे विहिरीप्रती । दोष जैसा न लागत ।।३१।। तैसा आत्मा देहांत । चतुर्देही आकार घेत । त्यांच्याहून भिन्न असत । दोषांनी लिप्त न होय ।।३२।। सोऽहं ब्रह्मात संस्थित । भेदहीन महामुनि ख्यात । बहूदक तो संगरहीत । देहाहून भिन्न असे ।।३३।। तदनंतर हंसाश्रम असत । जो असे मानसदंड युक्त । देहवाणी दंडहीन असत । स्वेच्छाचारी असे तो ।।३४।। देह देहीं समायोगांत । ब्रह्मबोधात्मक तें असत । त्या द्विविध ब्रह्मांत जो स्थित । तो योगी तन्मय होईल ।।३५।। देही देहरूपी जळ असत । त्यांत ब्रह्म हें दुग्ध असत । हंस त्याचा ग्राहक होत । ब्रह्मरूप म्हणोनि ।।३६।। त्यानंतर परमहंस ख्यात । ज्ञानदंडपरायण जो असत । देहवाणी मन दंडें विहित । संन्यासाश्रमीं विशुद्ध ।।३७।। देह देहीमय तें भ्रांति युक्त । ब्रह्म विशेषें असे वर्णित । तेंच सविषय वर्णित । हंस कर्म परायण ।।३८।। सदा जे साक्षी स्वरूप असत । परब्रह्म महामुने जगांत । त्यांच्यात होता संस्थित । विभागातीत महायोगी ।।३९।। न मी देह न मी देहस्थ असत । देह देहीमय नसत । सदा साक्षी स्वरूप स्थित । ज्ञान आनंदमय असे ।।४०।। जें जें असते अज्ञान । ते ते जन्मतें विकारांपासून । तें तें सोडून द्वंद्वहीन । स्वेच्छाचारी संन्यासी ।।४१।। चतुर्विध संन्यासाश्रम असत । त्याचें पालन विधियुक्त । मी ब्रह्म ह्या योगें युत । ब्रह्मभूत व्हावें नरे ।।४२।। जरी विषयांत रसयुक्त । असेल संन्याशाचें चित्त । तरी तो जाय नरकांत । ऐसें शास्त्र सांगतसे ।।४३।। जरी एक कवडीही लोभे घेत । तरी तो संन्यासी कुंभीपाक नरकांत । एक सहस्र वर्षें निवसत । ह्यांत संशय काही नसे ।।४४।। स्त्री संभोगाची इच्छा होता । क्षणभरही मानसीं तत्त्वतां । तरी गोसहस्र वधाची

शिक्षा पतिता । त्या यतीला संभवेल ।।४५।। कृत युगांत मानवांचें मन । सदा होय धर्माधीन । म्हणोनि मुख्य कथिलें ध्यान । त्यानें सर्व लाभतसे ।।४६।। त्रेता युगांत चंचल चित्त । धर्माचा एक पाय न्यून होत । म्हणोनि तप हें साधन होत । त्यानें लाभतें सर्व कांहीं ।।४७।। द्वापारांत देह कष्ट न सोसत । म्हणोनि स्वधर्माचार साधन ख्यात । तें करिता सर्वही लाभत । द्वापारांतील नरनारी ।।४८।। आसुरभावें कलियुगांत । धर्म नष्टप्राय होत । तेथ नामस्मरणें लाभत । सर्व ईप्सित नरांसी ।।४९।। वर्णाश्रम विभाग नसत । नामस्मरण मार्गांत । सदाचार हाच संन्यास होत । आसुरभावें नष्ट तो ।।५०।। आसुरबाहुल्यें कलियुगांत । संन्यास योग्यता न पावत । देह चित्तादि चंचल असत । तेणें नष्ट तो होईल ।।५१।। जो असे वर्णाश्रम विहिन । त्यासी नसे दंड म्हणून । अदंडी असे त्याचें वर्णन । वेद वाङ्मयीं केले असे ।।५२।। ज्ञान दंड परित्यागें होत । स्वयं योगी स्वेच्छारत । निषेध विधिहीन तो होत । स्वेच्छाधर्म परायण ।।५३।। वेदांत जे असे उक्त । तें करी तो विधि समायुक्त । वेदोक्त किंचितही न करित । तो निषेध संयुक्त नर ।।५४।। म्हणून विधि निषेध हीन । ऐसा योगी म्हणून । त्याचा आचार आदर्श पावन । योगप्रद जगतांत ।।५५।। म्हणोनि महाभागा दंडहीन । ऐसा योगी वर्णाश्रम विहीन । ब्रह्मभूत तो महान । वंदनीय सर्वांसी ।।५६।। विनायक नामा तो नायकें वर्जित । स्वयमेव सर्वांचा नायक असत । विशेष नायक म्हणून ख्यात । विनायक तो महायोगी ।।५७।। योगसेवेनें ब्रह्मभूत । ब्रह्मांत असे जो संस्थित । स्वेच्छेनें वर्णाश्रम ही आचरित । लोकसंग्रहार्थ धर्मपर ।।५८।। परि धर्म भोगांत निस्पृह असत । ऐसेहीं असे एकमत । नरनारायण महामुनीस म्हणत । मायारचित हा आश्रममार्ग ।।५९।। ओमिति

श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते आश्रमधर्मवर्णनं नाम एकोनविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय एकोणीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण वर्णाश्रमधर्म सांगती । च्यार वर्ण मुख्य असती । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शुद्र जगतीं । व्यभिचारें त्यांच्या नाना वर्ण ।।१।। मायाविनाशार्थ मुने तुजप्रत । मायेचें रूप सांगत । तेथ ब्राह्मणधर्म संक्षेपांत । प्रथम वर्णन करीन ।।२।। ब्राह्मणांची चतुर्धा वृत्ति । ऐसी असे शास्त्रउक्ती । उञ्छशिल तैसें शुक्ल जगतीं । मृत तैसें अमृतक ।।३।। अयाचित आणि भूमिकर्षण । वनात राहून उदरभरण । त्यांचें सांगेन सर्व लक्षण । जीविका ही ब्राह्मणांची ।।४।। शेतकरी धान्य नेती । परी कांहीं उरते शेती । कणादी ते गोळा करिती । ब्राह्मण देहपोषणार्थ ।।५।। अथवा वाणी लोकांच्या घरांत । धान्यकणादी जे पाखडित ।। ते वेंचून त्यावरी करित । देह पोषण ब्राह्मण ।।६।। ऐसी एक वृत्ति कथिली । आता दुसरी ऐक भली । भूमी न नांगरता पेरणी केली । स्वयं धान्य जे वाढे ।।७।। त्यावरी उदरनिर्वाह करित । शुक्लवृत्तीनें भिक्षा मागत । रागलोभादींनी वर्जित । त्यास म्हणती मृत वृत्ती ।।८।। परी जे न मागतां देती । जन तेवढेंच खाऊन जगतीं । ती जाणावी अमृत वृत्ति । ऐसे धर्मशास्त्र सांगतसे ।।९।। शेतकरी भूमी नांगरती । तेथे धान्याची होय उत्पत्ति । त्या धान्यानें देहपोषणीं मती । ब्राह्मणाने धरु नये ।।१०।। पूर्वभागीं स्वधर्म सांगितला । तो ब्राह्मणें पाहिजे आचरिला । सेवादीवृत्ति योगाला । ब्राह्मणें सदैव त्यागावें ।।११।। क्षत्रियांनी शस्त्रादि धारण करावी । देहपोषण वृत्ति बरवी ।

सेवादिवृत्ति वर्ज्य मानावी । अग्निहोम करावा द्विजहस्तें ।।१२।। क्षत्रियानें संन्यास न घ्यावा । वैश्यानें क्रयविक्रय करावा । गोपालन वा भूमिकर्षणाचा घ्यावा । आश्रय उदरपालनार्थ ।।१३।। संन्यासधर्महीन । क्षत्रियापरी वैश्यें राहून । यजन दान करावें । अध्ययनही करावें ।।१४।। परी न करावें याजनादिक । सर्व अग्निकर्मात्मक । देवतार्चनादी पावक । ब्राह्मणहस्तें करावें ।।१५।। वैश्य धर्म सर्व जाणून । करावें स्वधर्माचें पालन । ब्राह्मणमुखें तर्पण । मंत्रपूर्वक करावें ।।१६।। ऐसा हा वैश्यमार्ग कथित । शुद्र त्रिवर्ण सेवेंत रत । दासासम राहून होत । गृहस्थाश्रमी द्विज सेवक ।।१७।। द्विजासी दान द्यावें । पुराण श्रवण त्याने करावें । परी वेदाक्षर न ऐकावें । ऐसी आज्ञा शास्त्राची ।।१८।। पुराणांत देवांचें अवतार । त्यांचें श्रवण करावें सादर । त्या देवता मूर्ती प्रतिष्ठीत सुंदर । देवर्षींनी ज्या केल्या ।।१९।। त्या मूर्तीसी स्पर्शादी न करावा । शूद्रांनी नाममंत्र जपावा । स्वेच्छा प्रस्थापित मूर्तीसि नसावा । स्पर्श त्यांचा कदापि ।।२०।। नाममंत्रें पूजन । तैसेचिं करावें स्मरण । मृत्तिकेची मूर्ति स्थापून । तिचें पूजन करावें ।।२१।। आवाहनादि पासून । विसर्जनपर्यंत पुराणोक्त जपून । मंत्र सर्वत्र अर्चन । श्राद्धतर्पण करावें ।।२२।। ब्राह्मणांच्या मुखें सादर । करावा समग्र पूजोपचार । पुराणांतील श्लोक पवित्र । शुद्रानें ना म्हणावे ।।२३।। परी पुराणमंत्र ऐकावे । अंत्यजातिभवें स्वभावें । नामस्मरण सदा करावें । देवमूर्तीस स्पर्शू नये ।।२४।। पुराणमंत्रादींनी अर्चन । तैसें न करावें काही कर्म । पितर देवांसी उद्देशून । धनादींचें दान द्यावें ।।२५।। धान्याचेहीं करावे दान । हा असे मार्ग पुरातन । स्वधर्मे नियमें वागता जन । शूद्रही स्वर्गलोकीं जाती ।।२६।। महाभोग ते भोगती । तयांसी सुख भोगांची प्राप्ति । ब्राह्मण प्राजापत्यपद लाभती । क्षत्रियजन इन्द्रपद ।।२७।। वैश्य

वायव्यपद पावती । शूद्रादी गंधर्व होती । स्वकर्मरतांची ही गत्ति । मनीषी जन सांगती ।।२८।। ऐसे नानाविध भोग भोगती । मायामयही वर्णधर्माश्रमगती । जे ऐकती अथवा वाचिती । मायामोह नष्ट त्यांचा ।।२९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते वर्णधर्मप्रकाशो नाम विंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय विसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । नरनारायण पुढती सांगती । स्त्रीधर्म त्या मुनीप्रती । जन्मत:च स्त्रीस भोगिती । तीन देव आदरें ।।१।। चंद्र गंधर्व वन्हि देव सेविती । दोन वर्षें तियेसी प्रीति । धर्मनियमें सहा वर्षें निश्चिती । त्या आधी कोणा न द्यावी ।।२।। जरी सहा वर्षांपूर्वी विवाह करिती । तरी देवतांचा क्षोभ ओढविती । धर्मनाशामुळें चित्ती । दु:खी कन्यापिते ।।३।। सात आठ वा नऊ वर्षांची । कन्या कुलजा वरा द्यावयाची । संमती घ्यावी सुहृज्जनांची । ऐसें शास्त्र सांगतसे ।।४।। दहा वर्षांहून वयें वाढत । कन्या तरी रजोयुक्ता होत । त्या पूर्वी जरी न विवाहित । होत महापापवर्धिनी ।।५।। तिच्या जनकादींस लाभत । ब्रह्महत्येचें पाप पदापदांत । म्हणोनि विधिपूर्वक कन्या देत । तरी ती स्वर्गप्रदा होतसे ।।६।। कन्यादानासम पुण्य नसत । कन्येमुळें वंश वृद्धिंगत । सर्वांसी ती सुख देत । कन्येचें महत्त्व फार असे ।।७।। रजोदर्शन लाभता होत । कन्या स्त्रीपदयुक्त । वश राहून पतीस मानित । दैवत आपुलें ती सदा ।।८।। भक्तिसंयुत सेवावें । पतीस दासीसम स्वभावें । पति वनांत जाता जावें । तिनेंही त्याच्या मागून ।।९।। परी पुत्रादी बाल्यावस्थेत । असता पोषणार्थ गृहांत । रहावें न जाता वनांत ।

पतीसवें त्या नारीनें ।।१०।। जरी पति संन्यास घेत । तरी स्त्रियेनें आज्ञा तयाप्रत । देऊन रहावे व्रतसंस्थित । पति मरता करावें सहगमन ।।११।। वनस्थित जरी तो असत । पुत्रादीचें कर्तव्य नसेल युक्त । तरी तिनेही जावें वनांत । कर्तव्य आपुलें करावें ।।१२।। जरी पति मरता गर्भयुक्त । असेल वा रजस्वला त्या समयांत । तरी सहगमन न करितां शास्त्रोक्त । विधवाधर्म आचरावा ।।१३।। चवथ्या दिवशी पतिकर्मांत । पाचव्या दिवशी विप्रादि पूजेंत । रजस्वला स्त्री शुद्ध होत । विधवेनें रहावें एकभुक्त ।।१४।। व्रतादींनी शोषवावा स्वदेह । आदरें व्रत पालन निःसंदेह । हा सतींचा धर्म सुखावह । ऐकतां पुण्य स्त्रियांसी ।।१५।। समस्त पितृदेवतांचें कर्म करावें । मनुजांनीं आदरें मानावें । प्रथम पितृकर्म संक्षेपें ऐकावें । महामुने सांप्रत ।।१६।। अमावास्या येता श्राद्ध करावें । यथाविधि पिंडदान द्यावें । भुक्तिमुक्ति फलप्रद आघवें । अपराण्ह काळ श्राद्ध प्रशस्त ।।१७।। पोर्णिमेपासून अमावास्येपर्यंत । चुतर्दशी वर्ज्य तिथि असत । श्राद्धकार्यार्थ प्रशस्त । धर्मशास्त्र सांगतसे ।।१८।। शस्त्रादी विषयोगें जे मेले । त्यांचें श्राद्ध कृष्ण चतुर्दशीस प्रशंसिले । अन्यथा चतुर्दशीस वर्ज्य मानिलें । श्राद्धकर्मार्थ शास्त्रांत ।।१९।। कृष्णपक्षांत तीन अष्टका । पौष मासादीक तीनअष्टका । चारही पुण्यप्रद लोकां । श्राद्धकर्मांत सर्वदा ।।२०।। त्रयोदशी समायुक्त । युगादि तिथि संमत । मन्वादी तिथि प्रशस्त । पुण्यप्रद श्राद्धांत ।।२१।। व्यतिपात वैधृत योगांत । मृत बांधवांचे युक्त । दर्शपिंडादिक श्राद्ध धर्मसंमत । नैमित्तिक हें महामुने ।।२२।। काम्य श्राद्धें ग्रहणादीत । करावी असें प्रशंसित । अयनांत विषुववृत्तांत । तीर्थक्षेत्रीं अनित्यक ।।२३।। वारतिथीस स्वजन्म दिवसांत । नक्षत्रांत सर्व उचित । श्राद्ध करावे विशेषयुक्त । जेणें सुख लाभेल ।।२४।। अथवा सुख प्राप्तिस्तव । पितृलोक सुखास्तव । श्राद्ध

कामप्रद सर्व । नित्यवत् धर्मोक्त महामुने ।।२५।। अक्षय श्राद्ध गयेंत । अमरकंटकीं मयुरेशपुरांत । काशी आदि तीर्थक्षेत्रांत । विशेष फलप्रद होतसे ।।२६।। पितर गाथा गाती । मनीषी आनंदें नाचती । म्हणोनी बहु पुत्र वांछिती । शीलवंत गुणान्वित ।।२७।। त्या पुत्रांतील एक सुत । श्रद्धेनें जर गयेस जात । यथाविधि श्राद्ध करित । पितर तारिले त्यानें जगीं ।।२८।। तो स्वत: जाय परम गतीप्रत । जो धर्मोक्त श्राद्ध करित । वाराहपर्वतीं गयाक्षेत्रांत । मयूरक्षेत्री काशींत ।।२९।। अष्टविनायकांच्या क्षेत्रांत । गंगाद्वारी प्रभास क्षेत्रांत । बिल्वकांत नीलपर्वतात । कुरुक्षेत्रीं सेतुबंधीं ।।३०।। भृगुतुंगीं महालयांत । केदारी फल्गुतीर्थांत । नैमिषारण्यादीकांत । श्राद्ध करितां भुक्तिमुक्तिप्रद ।।३१।। चतुर्थी शुक्लकृष्णा संमत । एकादशी रविवार प्रशस्त । प्रदोष काळ अष्टमी ख्यात । श्राद्धार्थ सर्वसिद्धिप्रद ।।३२।। व्रतादींत विशेषें उक्त । नित्य देवार्चन श्रद्धायुत । तैसेंच नाना व्रतांचें पुनीत । आचरण करावें नरांनीं ।।३३।। अग्निहोत्रादींनी देवसेवन । तीर्थादिदान संभवें पावन । इष्टपूर्तादि संमत असून । विविधकर्म दैव पैतृक ।।३४।। ऐसी शास्त्रोक्त कर्में करुन । ब्रह्मार्पण करिता योगप्रद जाण । मायामय वर्णाश्रम कर्म महान । रचिलें विश्वयोगीनें ।।३५।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खण्डे महोदरचरिते देवपितृकर्मवर्णनं नामैकविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु।

(अध्याय एकविसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । नरनारायण पुढे सांगती । चतुर्दश मनूंची षट्कें असती । त्यांनी घोर तप केलें जगतीं । महात्मा गणेश देवाचें ।।१।।

नाना मंत्र जपांनी ध्यान । निराहार राहून करिती स्तवन । पूर्ण वर्ष सहस्त्रानंतर प्रसन्न । गजानन त्यांसी जाहला ।।२।। विघ्नपति प्रभु त्यास म्हणत । वरदान मागा मनोवांछित । देईन तें मी तुम्हांप्रत । स्तविती गजानना ते तेथवां ।।३।। बहुप्रकारें स्तवन करिती । त्याची गणना अशक्य जगतीं । सर्वांचें ईप्सित पुरवून जाती । स्वानंदपुरीं गजानन ।।४।। ते मनूही स्वस्वकर्मांत । निमग्न होऊन गणेशा आराधित । मन्वंतरें ऐसी उलटत । योगशांति ते इच्छिती ।।५।। क्रमानें होऊन ब्रह्मभूत । ते गणेशाप्रत जात । एकभावें योगज्ञ होत । योगाकार महामुने ।।६।। त्यांसी झाले बहुत सुत । त्यांचें वर्णन अशक्य असत । पौत्रादिक्रमें ते पाळित । वसुंधरा धर्मन्यायें ।।७।। वैवस्वत मन्वंतर होता प्राप्त । मनुपुत्रांचे जीवित । कैसें चाललें तें संक्षेपें तुजप्रत । महामुने मी सांगतो ।।८।। मनूचे दहा पुत्र ख्यात । पितृसम ते प्रतापवंत । सुद्युम्न पहिला त्यांच्यात । ज्येष्ठ पुत्र कन्या जाहली ।।९।। इक्ष्वाकु मृग शर्याति । दिष्ट धृष्ण करुषक जगती । नरिष्यंत पृषध नगभ नामें ख्याती । नव पुत्रांची मनूच्या ।।१०।। नऊ पुत्र सूर्यवंशात । शक्रतुल्य पराक्रमयुक्त । ज्येष्ठ तो चंद्रवंशात । स्त्रीरुपानें जन्मला ।।११।। त्याची कथा ऐसी असत । सुद्युम्न एकदा वनांत । होता मृगयार्थ हिंडत । अमित विक्रम सैन्यासह ।।१२।। दैवयोगें सुद्युम्ननृप प्रवेशत । तेव्हा गौरीच्या वनांत । प्रवेश करिता तत्क्षणीं प्राप्त । झाले स्त्रीरुप तयासी ।।१३।। शैल पुत्रीच्या साठीं शापित । होते तें वन शिवानें समस्त । अरे मार्कंडेया कारण असत । अति उग्र तयाचें ।।१४।। गौरी वनीं मानवा होते वसत । शंभु गौरी मोदयुक्त । नग्न राहून विषयसुख भोगित । दोघेंही ती परमानंदें ।।१५।। एकदा वसिष्ठादी मुनि जात । महेशदर्शनार्थ गौरीवनांत । अकस्मात् त्यांस पाहून वाटत । लज्जा नग्न त्या पतिपत्निला

।।१६।। ते मुनीही विमुख परतत । होऊनी मनीं अति लज्जित । तेव्हां शिव त्या वना शापित । पुरुषांसी प्रवेश वर्ज्य करी ।।१७।। जो कोणी पुरुष प्रवेश करील । ह्या गौरी वनांत तो पावेल । स्त्रीरुप ऐसा शाप सबल । शंभूनें दिला त्या वेळी ।।१८।। त्या शापानुसार लाभत । सुद्युम्नासी नारीरुप क्षणांत । पुष्ट स्तनभारें तो शोभत । यौवनानें मुसमुसला ।।१९।। तेव्हां तेथ दैवयोगें येत । चंद्रपुत्र बुध त्या स्थानांत । पाहोनी सुंदर नारी होत । अति आसक्त तिच्यावरी ।।२०।। तिचेंही मन जडलें तयावर । त्यानें भोगिली ती नारी सुंदर । आपुल्या स्थानी नंतर । परतून गेला चंद्रसुत ।।२१।। ती नारी झाली लज्जित । पुढें तिच्या उदरीं जन्मत । चंद्रवंशधर पुरुरवा प्रख्यात । पितृभक्तिपरायण ।।२२।। श्राद्धकर्मांत विख्यात । ऐसा पुत्र तिज होत । नारीरूप सुद्युम्ना देत । वसिष्ठमुनी गणेशमंत्र ।।२३।। विनायकाय नमः हा मंत्र देऊन । केलें राजपुत्रीस पावन । तिनेही वनांत जाऊन । केलें अति उत्तम तप ।।२४।। एकशत वर्षे तप करित । तेव्हां गणाध्यक्ष प्रसन्न होत । तिच्यापुढे तैं प्रकट होत । तिनें पूजिलें तयासी ।।२५।। त्याचें केलें स्तवन । तेव्हां ढुंढी देत वरदान । मागितला पुरुषभाव शोभन । तथास्तु म्हणे विनायक ।।२६।। तत्क्षणी नररूप देऊन । गणेश जाय परतून । भक्तवत्सल गजानन । आपुल्या स्वानंदलोकात ।।२७।। तदनंतर सुद्युम्नरूपें जगांत । पुनरपी तो झाला ख्यात । त्यास जाहले तीन सुत । उत्कल गया विनीत नाम ।।२८।। पुत्र तरुण होता देत । आपुलें राज्य तयाप्रत । स्वयं जाऊन वनांत । गणेशा तोषवी योगमार्गे ।।२९।। शांति योगधर तो वनसंस्थित । अंतीं सायुज्यता लाभत । गणेशाची परम पुनीत । महाबळ तो सुद्युम्न ।।३०।। सुद्युम्न जेव्हा स्त्रीरूपांत । इला नामें होता निवसत । तेव्हां इक्ष्वाकूस राज्यावरी नेमित । मनु धर्मानुसार

।।३१।। महाभाग तो वनीं जात । वैवस्वत मनु महामंत्र जपत । सूर्यापासून जो मिळाला तयाप्रत । षडक्षर बळयुक्त ।।३२।। सूर्ये तया सांगितला । योगमार्ग गणेशाचा भला । त्यानें शांतिलाभार्थ सेविला । जाहला शांत अंतीं तो ।।३३।। स्वर्गी नित्य श्रद्धेनें भजत । महायोगी गणपति देवाप्रत । मनू न सोडी स्मरे अविरत । विघ्नराज गणेशासी ।।३४।। इक्ष्वाकू पुत्रलाभ इच्छित । वसिष्ठ त्यास उपदेश देत । अष्टाक्षर मंत्रें तोषवित । गणनायकासी इक्ष्वाकू ।।३५।। शंभर वर्षे मंत्र जपत । तेव्हां गजानन प्रसन्न होत । उत्तम वर त्यास देत । इक्ष्वाकू पूजी गणेश्वरा ।।३६।। वरदान तया देऊन । गणेश गेला परतून । विकुक्षि नामक सुत लाभून । इक्ष्वाकु सुख तैं पावला ।।३७।। तेजस्वी दृढ पराक्रमी सुत । जेव्हां यौवनीं पदार्पण करित । तेव्हां त्यास राज्यावरी स्थापित । स्वयं गेला वनांत ।।३८।। इक्ष्वाकु पुन्हा तप करित । मंत्र नेमें तो जपत । तेणें विघ्नपासी तोषवित । क्रमें शांतियुक्त तो झाला ।।३९।। ब्रह्मभूत स्वभावस्थ होत । स्वानंदलोकांत तो जात । गणेशसायुज्य लाभत । इक्ष्वाकु मुक्त जाहला ।।४०।। विकुक्षीस पंधरा सुत । लाभले त्यांत ज्येष्ठ असत । ककुत्स्थ नामें प्रख्यात । त्याची कथा ऐक आतां ।।४१।। दैत्य एकदा पीडा देत । समस्त देवगण तेणें त्रस्त । त्या नृप सुताप्रत जात । साहाय्य त्याचें मागती ।।४२।। तोही महा तेजस्वी लढत । दैत्यांसवें बळवंत । तेव्हां इंद्र बैलाचें रूप घेत । त्याच्या ककुदावरी नृप आरुढ ।।४३।। ऐसा जाउन रणांत । तो सर्व दैत्यांसी मारित । विजयश्री बैसोनि आणित । ककुदावरी इंद्रवृषभाच्या ।।४४।। म्हणोनि ककुत्स्थ नामें ख्यात । तो नृप सर्व देवगणांत । गणेश्वरभक्त तो उपासना करित । विघ्नेश्वर देवाची ।।४५।। त्यापासून पृथु होत । विश्वरंधि पृथूचा सुत । त्यापासून चंद्र जन्मत । युवानाश्वक त्याचा सुत ।।४६।।

तदनंतर शाबन जन्मत । शाबनाचा बृहदश्व सुत । त्याचा पुत्र कुवलयाश्व ख्यात । धुंधुहा सुत कुवलयाश्वाचा ।।४७।। धुंधू नामक महादैत्य मारिला । म्हणोनी धुंधुमार नावें ख्यात झाला । तीन पुत्र धुंधुमाराला दृढाश्व कपिलाश्व भद्राश्व हे ।।४८।। दृढाश्वाचा हर्यश्व सुत । महाबळ पराक्रमयुक्त । हर्यश्वाचा निकुंभ सुत । त्याचा सुत बर्हणाश्वक ।।४९।। त्यास जाहले दोन सुत । कुशाश्व रणाश्व नामें ख्यात । कुशाश्वाचा पुत्र असत । युवनाश्व नावें ज्ञात जगीं ।।५०।। तो युवनाश्व युद्धांत । देवतुल्य परम द्युतिमंत । पुत्रार्थ यज्ञ करित । वरुणदेवासी तोषवाया ।।५१।। यज्ञकर्म करून मंत्रित । यज्ञजल तें राजा पीत । दैवयोगें होऊन तृषार्त । ब्राह्मण तेव्हां विचारिती ।।५२।। कोण प्याले मंत्रजल । राजानें प्यालें हें समजता विकल । विस्मित जाहले ब्राह्मण सकल । म्हणती नृपा हे काय केलेंस? ।।५३।। आता तुझ्या उदरांत । गर्भ वाढेल निश्चित । यज्ञ पूर्ण करुन स्वगृहाप्रत । परतून गेले महामुनी ।।५४।। युवनाश्वाच्या उदरांत । गर्भ वाढूं लागला अद्भुत । गर्भाची वाढ संपूर्ण होत । पोट फाडून बाहेर आला ।।५५।। पुनरपी उदर दिले सांधून । तेव्हा कोणाचा आश्रय यास पावन । मिळेल ऐसें विचारता वचन । इंद्र म्हणे मी पाळीन यास ।।५६।। धास्यति ऐसें विचारित । तेव्हां इंद्र 'मां ध्यास्यति' म्हणत । म्हणोनी मांधाता नाम जगात । त्या पुत्राचें रुढ झालें ।।५७।। इंद्रानें त्यास वाढविलें । परम द्युतियुक्त त्याचें शरीर शोभलें । सर्वांसी वश करुन प्राप्त केलें । सार्वभौमपद तयानें ।।५८।। अव्याहत गति होऊन । देवतुल्य स्थिति लाभून । असंख्यात गणयुक्त महामन । मांधाता तो जाहला ।।५९।। वसिष्ठापासून योग लाभत । गणराजाची भक्ति अविरत । पुरुकुलीं सुता राज्यीं स्थापित । अन्तीं ब्रह्मभूत स्वानंद लाभे ।।६०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि

श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते मांधातुश्चरित्रकथनं नाम द्वाविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय बाविसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । मार्कंडेय मुनि विचारित । पुढील कथा नरनारायणांप्रत । अंबरीष मनुवंशांत । एकादशी व्रत नित्य करी ।।१।। त्याचें चरित्र आम्हां सांगावें । हें प्रार्थित आमुचें ऐकावें । नरनारायण म्हणती परिसावें । अंबरीष कथानक ।।२।। मनुवंशीं अंत्यपुत्र होत । अंबरीष नामा प्रतापवंत । नित्य विष्णूस तो भजत । अनन्य मानस श्रद्धेनें ।।३।। एकादशीव्रत आचरित । माधवासी तो तोषवित । ऐसा बहुकाल लोटत । एकदा होती द्वादशी ।।४।। त्या तिथीस दुर्वास येत । क्रोधशाली अतिथि त्याच्या गृहांत । एकादशीव्रत पारणा असत । अतिथि आला त्या वेळीं ।।५।। त्यास प्रणाम करून । राजर्षि बोले कर जोडून । भगवन् स्वल्पकाळ उरला म्हणून । द्वादशी पारणा करण्यासाठी ।।६।। आपण स्वल्प काळांत । संध्यादि करुन यावें परत । तैं स्वीकारून तीर्थाप्रत । निघोनि गेला दुर्वास ।।७।। तेथ शीघ्र संध्यादिक करित । परी द्वादशी योग होत प्रगत । मुहूर्त मात्र विलंब होत । तयासी परत यावसायी ।।८।। म्हणोनी पलमात्र द्वादशी जाणून । अंबरीषें केलें पारणा पावन । विष्णूचें तीर्थ प्राशन करुन । उपवास सोडिला तयानें ।।९।। नंतर अतिथिची राजा वाट पाहत । अंबरीष तो विनययुत । तेव्हां शीघ्रगति दुर्वास परतत । वृत्तान्त सत्य त्या सांगितला ।।१०।। विस्तारें ऐकून वृत्तान्त । दुर्वास कोपला अत्यंत । अंबरीषास शाप देत । म्हणे नृपा हें अनुचित केलें ।।११।। मज निमंत्रण देऊन । तूं केलेस प्रथम भोजन । पारणा कैशी होय साधन । फल तुजला न लाभेल ।।१२।।ऐसें बोलून

दुर्वास जात । स्वेच्छेनें अन्यत्र संचार करीत । नृप जाहला दु:खी बहुत । उपोषण घडे तयासी ।।१३।। कांहीं भक्षण न करित । दुर्वासाची वाट पहात । आल्या अतिथीस सोडून सुखांत । भोजन कैसें करू म्हणे? ।।१४।। ऐसा एक संवत्सर निराहार । राहिला जपध्यान पर । तेव्हां नारदमुनी येऊन तत्पर । विचारिती वृत्तान्त ।।१५।। त्याची विधियुक्त पूजा करुन । अंबरीषें सर्व केलें कथन । नारद म्हणे तयासी वचन । जलप्राशनें केलेंस पारणा तूं ।।१६।। अन्यथा उपोषण युक्त । पाळिलेस धर्मानुसार व्रत । द्वादशी व्रत तें पूर्ण होत । सिद्धि तुजला लाभेल ।।१७।। अपराध तुझा नसून । उपस्थित झालें हें विघ्न । दुर्वास कोपसंयुक्त मन । गेला क्षुधित परतून ।।१८।। तुझ्या गृहांतून त्वरित । आता तूं विघ्नराजा भज निश्चित । तेणें विघ्नविहिनता प्राप्त । होईल तुजला नि:संशय ।।१९।। तुझ्यास्तव मज विष्णूनें पाठविले । नृपसत्तमा रूप पहिलें । सर्वांचे जे गणेश्वर भले । तोच हा विष्णु आदि अन्तीं ।।२०।। शिव विष्णु आदी असत । गण त्याचे ते नियुक्त । नाना कार्यीं होत रत । ऐसें जाण अंबरीषा ।।२१।। चित्त बुद्धिरूप असत । तेथ चिंता मनीं निवसत । त्या बुद्धिपतीस त्वरित । शरण जाई तूं वत्सा ।।२२।। सिद्धिपतीस सोडून । जो इच्छितो सिद्धिलाभ महान । त्या दुर्मतीस असिद्धि लाभून । सर्वत्र अपयश येतसे ।।२३।। ऐसें बोलून त्या मुनीप्रत । गणपतिषडक्षर मंत्र देत । महावैष्णव तो जपत । नारद गुप्त झाले ।।२४।। अंबरीष त्या वेळेपासून । विघ्नेशासी जात शरण । मंत्रराजाचा जप पावन । विनायक पूजन भक्तीनें ।।२५।। विष्णू गणेशांत भेद नसत । हें अंबरीष मनीं ठसवीत । गणेशाची मूर्ति दिसत । चतुर्धा ती सर्वत्र ।।२६।। नंतर दुर्वासाचें चित्त । आपोआप झाले द्रवित । दया येऊन तो जात । अंबरीष नृपाचे घरीं ।।२७।। या मुनींद्रासी पाहून ।

नृप झाला विस्मित मन । प्रथम त्यास प्रणाम करुन । नंतर पूजी भक्तिभावें ।।२८।। नंतर त्या नृपशार्दूला म्हणत । मुनिसत्तम दुर्वास हर्षित । तुझा विनय पाहून झालो लज्जित । अपराधास्तव क्षमा करी ।।२९।। तूं अपराधहीन असून । शाप दिला मी साहसें करुन । परी तूं साधुभाव धरुन । उपवासयुक्त राहिलास ।।३०।। म्हणोनी तूं झालास विनययुत । मज सोडून पारणें जें केलेंस श्रद्धायुत । जलप्राशनें एकादशी होत । निष्फल तुझी ऐसें जाण ।।३१।। परी अन्य एकादशिचें फल । मिळेल तुजला पूर्ण अमल । ऐसे सांगून त्या वेळ । भोजन करी नृपासहित ।।३२।। तो मुनिसत्तम दुर्वास परतत । अनुग्रह करुन स्वाश्रमाप्रत । अंबरीष तदनंतर भजत । गणेशासी अविरत ।।३३।। त्या अंबरीषासी झाले बहु सूत । त्यातला ज्येष्ठ जो असत । त्यास राज्यावरी स्थापित । स्वयें गेला वनांतरी ।।३४।। तेथ भक्तिभावें गणपतीसी पूजित । अनन्य हृदये मनी चिंतित । कालांतरें गणेशाप्रत । योगसाहाय्यें जाता झाला ।।३५।। अंबरीषाचे हें चरित । जो वाचेल अद्भुत । किंवा ऐकेल प्रेमयुत । भुक्तिमुक्ति शाश्वत त्यास लाभे ।।३६।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते अंबरीषचरितं नामं त्रयोविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु।

(अध्याय तेविसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । नरनारायण कथा पुढें सांगत । पुरुकुत्साचें दायाद असत । महाबळी अंबरीष एक ख्यात । दुसरा मुचुकुंद नावाचा ।।१।। अंबरीष राज्य करुन । अन्तीं पुत्रासी राज्य देऊन । सुविपुल तप आचरुन । गणेशसायुज्य लाभला ।।२।। मुचुकुंद राजर्षि राज्य

करित । धर्मयुक्त महातेजयुक्त । शक्रतुल्य पराक्रमी असत । देवांसही आधार त्याचा ।।३।। एकदा देवदैत्यांचें युद्ध होत । दैत्य देवांसी जिंकत । मुचुकुंदासी तेव्हां शरण जात । देव सर्वही परमादरें ।।४।। त्यांची प्रार्थना ऐकून । मुचुकुंद गेला धावून । शस्त्रबळें करी हनन ।। महादैत्यांचे त्या वेळीं ।।५।। युद्धप्रसंगी काल बहुत । जाता युगातिक्रमण होत । युगभेद पाहून देवांस म्हणत । आद्य ज्ञान द्या मजप्रतीं ।।६।। नंतर ते देव परमभावित । मुचुकुंदासी सांगत । आता पर्वतद्रोणींत । निद्रा घ्यावी आपण ।।७।। नृपा तुज जो उठवील । त्याचें मरण ओढवेल । तेथ तुजला होईल । वासुदेवाचे दर्शन ।।८।। तो महायोगी नृपोत्तमा देईल । ज्ञान श्रेष्ठ तुज विमल । ते ऐकून वाक्य अमल । गंधमादनावरी गेला ।।९।। तेथ एका द्रोणींत । निजला मुचुकुंद आनंदांत । बहु काळ ऐसा लोटत । विष्णु तैं जाहला वसुदेवसुत ।।१०।। विष्णु साक्षात महायोगी अवतरला । तपानें त्यास आराधिला । महावीर कंसासी मारून राहिला । मथुरेंत वासुदेव ।।११।। कंसाचा श्वशुर अत्यंत । तेव्हां झाला क्रोधयुक्त । जरासंध नामा तेथ येत । सैन्यासहित युद्धार्थ ।।१२।। शाल्वकादी नृपांसहित । तेवीस अक्षौहिणी सेनेसहित । आला चालून मथुरेप्रत । कृष्णों त्याचें मर्दन केलें ।।१३।। संकर्षणासमवेत । श्रीकृष्ण महातेजयुक्त । जेव्हा त्याचा नाश करित । तेव्हां जरासंध माघार घेई ।।१४।। पळून गेला स्वस्थानांत । सैन्यासह झाला पराजित । सतरा वेळा पुन्हा येत । लढण्या परी यश न मिळालें ।।१५।। तेव्हां त्यानें यवनाधिपती । दुष्ट कालयवनाची प्रीति । सहाय मागून लढण्या पुढती । आला चालून मथुरेवरीं ।।१६।। गर्गशापें यादव विनाश ओढवला । यवनराज त्यापरी आला । तें जाणून त्या समयाला । समुद्रात निर्मिली द्वारका ।।१७।। आपुल्या मायेनें निर्मिली । ऐसी ती नगरी भली ।

यादवांची तेथ केली । पाठवणी श्रीकृष्णानें ।।१८।। नंतर यवनराजासमीप येत । आपुलें रूप तया दाखवित । वासुदेव पलायन करित । तेव्हां मथुरा नगरींतून ।।१९।। नारदानें कृष्णाची चिन्हें सांगितली । यवनेंद्रें संधि साधली । कृष्णाची पाठ धरिली । निर्भत्सना करूं लागे ।।२०।। अरे कृष्णा महात्म्या धावसी । यदुवंशाला लांछन लाविसी । तूं जरी काळासम अससी । तरी कां भ्यालास मजलागीं ।।२१।। तेव्हा कृष्ण पुढें धावत । मागून कालयवन त्वेषयुक्त । मुचुकुंद जेथ झोपला निश्चित । त्या गुहेंत कृष्ण प्रवेशला ।।२२।। तेथ कृष्ण राहिला शांत । परी यवनेंद्र मुचुकुंदा लाथ मारित । म्हणे निर्लज्जा येथ कां निद्रित । करी युद्ध माझ्यासवें ।।२३।। मुचुकुंदाची निद्रा भंगत । यवनाच्या वचनें जाग येत । तो प्रतापवंत नृप उघडित । नयन आपुले क्रोधानें ।।२४।। त्याच्या नेत्रांतून उद्भवत । अग्नी तो यवनासी जाळित । काळयवन मेला तें पाहत । जनार्दन आनंदाने ।।२५।। तदनंतर त्या नृपासमीप जात । हर्षनिर्भर त्याचें चित्त । त्यास पाहून प्रणाम करीत । मुचुकुंद भक्तिभावें ।।२६।। योगीश्वरासी कृष्णासी म्हणत । जैसे देवांनी कथिलें असत । तैसेंचि घडलें अकस्मात । आपुली भेट जाहली ।।२७।। आता ज्ञानमार्ग सांगावा । कृपानिधे मजला बरवा । जेणें मजला बोध व्हावा । प्रार्थना माझी ही विनम्र ।।२८।। हें ऐकून हर्षसमन्वित । परमयोगी कृष्ण सांगत । त्या महाभागासी ज्ञान अद्भुत । अपूर्व गणेश अभेदाचें ।।२९।। मी महामते गणेश्वर असत । पूर्णत्वें कांहीं भेद नसत । हेंच परम ज्ञान चित्तांत । ठसवावे तूं नृपोत्तमा ।।३०।। पंचविध चित्ताचा त्याग करून । त्याचें मोहप्रद ऐश्वर्य सोडून । योगसाहाय्यें आचरून । गणेशत्व पावशील ।।३१।। चित्तरूपा महाबुद्धि असत । ती मोहरूपा जगांत । तैसींच सिद्धि या माया वर्तत । तेथ बिंब जें स्थित ।।३२।।

तोच हा गणनाथ असत । हे योगसेवेनें पहावें सतत । बिंबभव भ्रम त्यागून चित्तांत । चिंतामणीचें दर्शन घे ।।३३।। गकारात्मक रूपा सिद्धि जाण । णकाररूपा बुद्धि सुजाण । त्यांचा स्वामी गणेश्वर ही खूण । त्यास भजावें महाभागा ।।३४।। तेणें शांतिलाभ होईल । ऐसें हे गुह्यतम ज्ञान निर्मल । नृपसत्तमा तुज अमल । कथिले परम दुर्लभ जें ।।३५।। ऐसा उपदेश ऐकत । नंतर कृष्णाची पूजा करित । पुनरपि कृष्ण मथुरेंत । परतून गेला प्रतापी ।।३६।। तेथे यवनांसी मारित । बलराम समवेत अगणित । जरासंध येता पळून जात । द्वारकेंत तो श्रीकृष्ण ।।३७।। तदनंतर पृथ्वीतलावर । मुचुकुंद झाला योगपर । जैसा कृष्णों कथिला समग्र । तैसा योग आचरिला ।। ३८ ।। त्या राजर्षीस शांति लाभत । पुढे तो विविध स्थळी भटकत । गणेशासी भजे अविरत । प्राणत्यागापर्यंत ।।३९।। मुचुकुंदाचें हें चरित । जो मर्त्य वाचित अथवा ऐकत । त्यास गणप प्रभु सर्व देत । यात संशय कांही नसे ।।४०।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खण्डे महोदरचरिते मुचुकुंदचरितं नाम चतुर्विंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चोविसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । नरनारायण पुढती सांगती । अंबरीषाचा पुत्र जगतीं । यौवनाश्व नामें त्याची ख्याती । त्याचा सुत हारित ।।१।। त्याचा पुत्र पुरुकुत्स असत । त्रसद्दस्यू त्यापासून जन्मत । अनरण्य झाला त्याचा सुत । त्याचा नातू हर्यश्व ।।२।। त्या हर्यश्वाचा पुत्र साधुसंमत । अरुण सूर्यवरानें संभवत । त्यास पुत्र सत्यव्रत । महायशस्वी विद्यावंत ।।३।। तोच त्रिशंकुनामें प्रख्यात । देहधारी जात स्वर्गलोकांत । त्याचा पुत्र हरिश्चंद्र असत । सर्वधर्मपरायण ।।४।। विश्वामित्रापासून जाणून ।

विघ्नेशातें करी वंदन । गाणेशक स्वयें होऊन । अन्तीं गेला स्वानंदलोकीं ।।५।। गणनाथाचें सायुंज्य लाभत । महायश तो भक्तियुत । त्याचा पुत्र झाला रोहित । रोहिताचा पुत्र हरित ।।६।। चंप सुदेव विजय जन्मत । भरूक वृकबाहू त्या कुळींत । बाहूचा आत्मज सगर असत । त्यास होत्या दोन भार्या ।।७।। प्रभा भानुमती नामें भक्तियुक्त । त्यांनी आराधिला भृगु योगी जगांत । पुत्रार्थ तो त्यांस वर देत । पुत्रप्रद अति प्रभावी ।।८।। साठ हजार मागितले सुत । प्रभा संतती महान वांच्छित । भानुमतीस परी इष्ट वाटत । एकच पुत्र असमंजस नामा ।।९।। तो योगयुत प्रतापवंत । सर्व शिशूंस धरुन टाकित । शरयूनदीमध्यें मारित । बालकविनाशी तो खळ ।।१०।। पित्यानें त्यागिता जात वनांत । मायाबळें सर्व शिशूस करी जिवंत । त्याचा पुत्र अंशुमान् ख्यात । धर्मपरायण प्रेमळ ।।११।। प्रभेस साठ हजार सुत । झाले कालांतरें जगांत । सगर तेव्हा यज्ञ आरंभित । अश्वमेध बलदर्शनासी ।।१२।। शंभर यज्ञ तेव्हां उचित । करणें हे उदिष्ट पुनीत । नव्याण्णव यज्ञ होता समाप्त । शंभरावा आरंभिला ।।१३।। अंत्य यज्ञ प्रारंभ होत । सुरेंद्र तेव्हां होय क्षुभित । मायाबळें अश्व नेत । पाताळलोकीं सत्वर तै ।।१४।। कपिलाचा आश्रम असत । जेथे पाताळ लोकांत । तेथ यज्ञाचा अश्व बांधित । इंद्र तेव्हां हेतूनें ।।१५।। सगराचे साठ हजार । परम दुर्जय ते पुत्र । शोध करिती अति उग्र । यज्ञीय अश्वाचा प्राणपणें ।।१६।। अश्वाची पाऊलें भूमींत। उमटली होतीं तें पाहत । म्हणोनि विचक्षण ते खणित । बळाने भूमी समग्र ।।१७।। तेव्हां त्यांनी निर्मिला । लवणात्मक समुद्र ख्यात झाला । म्हणोनि सागर नाम पावला । सगरपुत्रांची ती निर्मिति ।।१८।। ते सगर पुत्र पाताळांत । जेव्हां इतस्तत: संचार करित । अश्वराजासी पाहत । कपिलमुनी समीप ।।१९।। यज्ञीय अश्व होता चरत । कपिलांच्या

आश्रमांत । त्या मुनीसी चोर मानून धावत । शस्त्रास्त्रांनी मारावया ।।२०।। कपिलाच्या क्रोधाग्नींत । ते सगरपुत्र भस्मीभूत । पुरंदर तैं होत हर्षित । प्रतापी त्या यज्ञविघ्नानें ।।२१।। नारदें सांगतां वृत्तान्त । सगर अंशुमान पौत्रका पाठवित । तो महाद्युती जाऊन नमित । कपिलाची स्तुति करी ।।२२।। तेव्हा तो कपिल यज्ञाश्व देत । तो घेऊन अंशुमान परतत । आपुल्या आजोबांजवळ जात । तेणें यज्ञ पूर्ण झाला ।।२३।। सगर अश्वमेध संपूर्ण करित । अंशुमानासी राज्यीं स्थापित । महायश स्वयं वनीं जात । गणेशाचा महामंत्र त्यास मिळे ।।२४।। गुरूपासून मिळता योग शांतिद । मंत्र गाणेश जपे तो सुखद । योगी होऊन परमद्युतिमानद । अनन्यमनें गणेशा भजे ।।२५।। अंतीं गणेशाप्रत जात । ब्रह्मपरायण सतत । अंशुमान कपिलापासून लाभत । ज्ञान गणेशयोगाचें ।।२६।। तोही गणेशास नित्य भजत । गाणपत्य स्वभावें वर्तत । त्याचा पुत्र दिलीप ख्यात । दिलीपसुत भगीरथ ।।२७।। दिलीपें राज्यावरी स्थापिला । सद्धर्मं राज्य करु लागला । एकदा नारदमुनी जाता झाला । भगीरथा भेटावया ।।२८।। त्यानें पूजा केली उत्तम । तेव्हा नारद म्हणे वचन अभिराम । तुझ्या या प्रपितामहांचा मृत्यु पूर्वी जाण । झाला ब्राह्मण क्रोधानें ।।२९।। कपिलाच्या शापाग्नींत । साठ हजार ते दग्ध मृत । त्यांना गति नाहीं मिळत । सांप्रत त्यांचें हित करावें ।।३०।। स्वर्गंगा महाराजा आणून । भूवरी तिच्या जळात मग्न । कराव्या त्यांच्या अस्थी पावन । तेणें स्वर्ग त्यांस लाभेल ।।३१।। ऐसें सांगून गणपासी स्मरत । महायोगी नारद स्वर्गी परतत । इकडे भगीरथ चित्तांत । अति दुःखित जाहला ।।३२।। प्रधानांवरी राज्य सोडून । स्वयें वनीं जात उन्मन । तपश्चर्या करी महान । आराधना करी स्वर्नदीची ।।३३।। वर्ष शत पूर्ण होत । तपश्चर्या करी अविरत । तेव्हा स्वर्गवाहिनी गंगा प्रकटत ।

भगीरथापुढें प्रसन्न ।।३४।। भक्तिसंयुत नृप पाहत । त्यास वर देऊ करीत । भगीरथ विविध प्रकारे स्तवित । प्रतापवन्त महाभक्त ।।३५।। म्हणे स्वर्गंगे जरी प्रसन्न । महाभागे तरी कर पावन । माझ्या पणजोबांस येऊन । पृथ्वीवरी आत्मोदकें ।।३६।। स्वर्गंगा म्हणे तयाप्रत । मी येईन भूतलीं निश्चित । परी माझा वेग धारण करित । ऐसें स्थान शोधावें ।।३७।। ऐसा पात्र जो असेल । जो माझा भार सहन करील । त्यास तूं विनवी विमल । तरी येईन भूतलावरी ।।३८।। स्वर्नदीचें ऐकून वचन । भगीरथ करी आराधन । शंकरांचे त्यास जाणून । सुपात्र गंगा अवतरणार्थ ।।३९।। एक वर्ष तप करित । तेणें शंभू प्रसन्न होत । म्हणे वर माग मनोवांच्छित । तेव्हां मागे भगीरथ ।।४०।। जरी शंकरा प्रसन्न । झालास तरी द्या वरदान । स्वर्नदी धारण करा महान । आपुल्या जटाभारावरी ।।४१।। शिवानें तथास्तु म्हणता स्मरत । स्वर्गंगेसी चित्तांत । ती प्रकट होता सांगत । देवी शंकर करुणानिधि ।।४२।। ते तुजला धरतील । महीतलीं जेव्हां अवतरशील । हें ऐकता गर्वयुक्त प्रबल । पडली शिवमस्तकीं स्वर्गंगा ।।४३।। सहस्र धारांनी पडत । स्वर्गांतून भूतलीं जोरांत । शिवमस्तक बुडवून क्षणांत । जाईन म्हणे रसातळीं ।।४४।। ऐसा विचार मनीं करित । तिचा गर्व मायेनें जाणत । शंकर आपुल्या जटेंत । सामावून तिज घेत असे ।।४५।। तेव्हां स्वर्गंगा जटेंत । शंकराच्या तेथे वाहत । परी शिवजटेच्या अंत । तिजला ना सांपडला ।।४६।। नंतर नृप त्यासी प्रार्थित । म्हणोनी शिव तिज सोडित । धरणीतळावरी वाहत । तेथे पाहे जन्हू नृपासी ।।४७।। जन्हु मग्न होता तपांत । त्या घोर तापसा ती म्हणत । दूर हो मार्गांतून त्वरित । अन्यथा तुज बुडवीन ।।४८।। परी जन्हू घोर तपव्रतांत । मग्न होता म्हणोनी न देत । उत्तर काहीही तिजप्रत । तेव्हा गंगा संतप्त झाली ।।४९।। जन्हूस बुडविण्या धावत । तें जाणून

क्रोध संतप्त । तो नृप पिऊन टाकी गंगेस त्वरित । पुन्हा तपार्थ बैसला ।।५०।। तें पाहून भयभीत । तैसाची मनीं दुःखित । भगीरथ त्यास प्रणाम करीत । प्रार्थना करी आर्तभावें ।।५१।। म्हणे महायशा गंगाजल । आपण सोडावें विमल । पूर्वज उद्धरतां बळ । वाढेल माझें जगांत ।।५२।। त्याची प्रार्थना ऐकत । आपुल्या मांडीतून वाट देत । तेव्हा गंगा पुढे वाहत । जन्हुसुता ती म्हणोनी ।।५३।। जन्हूची पुत्री जान्हवी ख्यात । पुढे वाहे वेगसंयुक्त । सगरपुत्रांच्या अवशेषां बुडवीत । शुद्ध शांतिजलांत आपुल्या ।।५४।। सुंदर विमानांत आरूढ होत । सगर पुत्र उद्धरून जात । भगीरथा सन्निध प्रकट होऊन त्वरित । स्वर्गलोकीं ते गेले ।।५५।। भगीरथें स्वर्गवाहिनी पूजिली । म्हणोनी ती पृथ्वीवर आली । जन्हूची कन्या नंतर शोभली । भागीरथी नामें ख्यात ।।५६।। ऐसा भगीरथ प्रभावयुक्त । त्याचा पुत्र श्रुत असत । त्यास तो राज्यावरी स्थापित । स्वतः गेला वनांतरी ।।५७।। वसिष्ठापासून लाभत । गाणेशक योग तो साध्य करित । गाणपत्य होऊन अंतीं प्राप्त । गणेशसायुज्य योगसेवेनें ।।५८।। हें भगीरथाचें आख्यान । वाचील वा ऐकेल प्रसन्न । त्यासी भुक्तिमुक्ति लाभून । गणेशकृपा प्राप्त होईल ।।५९।। ओमिति श्रीमदांत्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्‌गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते सगरभगीरथचरितं नाम पंचविंशतितमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय पंचविसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नमः । नरनारायण कथा सांगती । मार्कंडेय मुनी ऐकती । श्रुताचा पुत्र नाभा जगतीं । त्याचा सुत सिंधुद्वीप ।।१।। अयुतायू त्याचा सुत । ऋतुवर्णक त्यापासून संभवत । त्यापासून नलसखा जन्मत ।

अश्वविद्यापरायण ।।२।। सर्वकाम त्याचा सुत । सुदासक त्यापासून संजात । सौदास त्याचा पुत्र ख्यात । पुढला वंशज कल्माषपाद ।।३।। कल्माषपाद क्षेत्रांत । वसिष्ठ मुनिसत्तम निर्मित । ईश्वाकुकुल वर्धक अश्मक ख्यात । त्याचा सुत मूलक ।।४।। तो रामभयें वनांत । जाऊन राहिला सुदु:खित । तेथे नारीरूपें राहत । नारीजनांनी परिरक्षित ।।५।। म्हणोनी नारीक वचन नामें ज्ञात । त्या कृतीनें तो जगांत । त्यापासून शतरथ जन्मत । त्याचा वंशज ऐलानिल ।।६।। त्यापासून विश्वसह जन्मत । खट्वांग ढुंढी ख्यात । दीर्घबाहू त्याचा सुत । त्याचा पुत्र अज नृपति ।।७।। अजाचा दशरथ सुत । कश्यपाचा अंश स्मृत । त्याच्या भार्या तीन असत । रूपें सर्वही अप्रतिम ।।८।। कौसल्या कैकेयी सुमित्रा नामें ज्ञात । साऱ्या होत्या धर्मसंयुत । यौवनीं पदार्पण करित । परी न झाली सुतप्राप्ति ।।९।। व्रततीर्थादीक नाना यत्न । केले नृपतीने महान । परी सुत लाभ न होतां उन्मन । सस्त्रीक वसिष्ठां भेटण्या गेला ।।१०।। प्रधानांवरी राज्य धुरा । ठेवून गेला वनांतरा । शरण जाता मुनीश्वरा । वसिष्ठांसी दशरथ नृप ।।११।। दशाक्षर गणेशमंत्र देत । तेव्हां तया नृपाप्रत । त्याच्या पत्नीसहित पुनीत । दशरथें तो स्वीकारला ।।१२।। प्राचीन परंपरेनें सूर्यकुळांत । गजानन कुलदैवत । जन्मलास तूं त्याच्या वंशात । विसरलास परी गजाननासी ।।१३।। त्याची विस्मृति होतां न लाभत । सिद्धि इहपरत्र अद्भुत । विघ्नपीडा बाधे अवचित । म्हणोनी भजावें तूं गणाधिपासी ।।१४।। हा मंत्रराज कुलपरंपरागत । न सोडावा जगांत । सोडता हानि होत निश्चित । ऐसें जाण दशरथा तूं ।।१५।। तें ऐकून वसिष्ठवचन । नृप करी वनांतरीं गमन । उग्र तप करी महायश एकमन । वायुमात्र भक्षून राहे ।।१६।। पत्नीसहित गणनायका पूजित । विनीतभावें मंत्र जपत । ऐशापरी एक वर्ष शत । पूर्ण होता काय

जाहलें ।।१७।। गणेश झाले प्रसन्न । मूषकारुढ ते होऊन । प्रकटले देण्या वरदान । दशरथाच्या संमुख ।।१८।। त्यास पाहून वरती उठत । स्त्रियांसहित तया पूजित । विविध स्तोत्रांनी स्तवित । प्रणाम करी पुन:पुन्हा ।।१९।। तेव्हां गणराज त्यास म्हणत । नृपोत्तमा मनोवांच्छित । वर माग मी देईन निश्चित । प्रसन्न तुझ्या तपानें ।।२०।। त्याचें तें वचन ऐकून । दशरथ म्हणे जरी देवेशा प्रसन्न । तुझी भक्ति देई मजलागुन । जेणें अज्ञान नाश पावे ।।२१।। गणाधीशा दुसरें मागत । पृथुल कीर्ति द्यावा सुत । जो अप्रतिम बळें युक्त । तुझ्या भक्तींत परायण ।।२२।। मी जेथ तप आचरित । तेथ तूं व्हावें सुस्थिर स्थित । लोकांचें पुरवावें मनोवांछित । मागणें हें पुरवावें ।।२३।। तथास्तु गणनायक म्हणत । अंतर्धान नंतर पावत । स्वानंद लोकीं परतत । नंतर नृपें काय केलें? ।।२४।। वसिष्ठ हस्तें मूर्ति स्थापित । गणेशाची आदरयुक्त । तें सकल सिद्धिप्रद क्षेत्र प्रख्यात । तदनंतर जाहलें ।।२५।। गजाननास भावें पूजून । अयोध्येत दशरथ नृप परतून । सर्व प्रजेस हर्षित मन । संतोषविलें तयानें ।।२६।। नंतर रावणनाशास्तव आज्ञापित । विष्णूस गणेश प्रभु बळवंत । तेव्हां विष्णु अवतार घेत । दशरथाचा पुत्र म्हणोनी ।।२७।। अव्यय हरि विभागीत । आपुलें स्वरूप चार रूपांत । कौसल्येचा पुत्र होत । राम श्रेष्ठ शस्त्रधारी ।।२८।। कैकेयीचा भरत सुत । सुमित्रेचें दोन पुत्र ख्यात । लक्ष्मण शत्रुघ्न सर्वही असत । विप्रेंद्रा विष्णुसम तेजें ।।२९।। नंतर दशरथ नृप कामासक्त । गणनायकाते न स्मरत । रामाचें उपनयनादी करीत । विश्वामित्र तेथ येई ।।३०।। विश्वामित्र यज्ञरक्षणार्थ मागत । रामाचें साहाय्य नृपाप्रत । तेव्हां लक्ष्मणही सवें जात । यज्ञरक्षण ते करिती ।।३१।। सुबाहुक नाम दारुण असुर । मारिला तेव्हां मुनिवर उग्र । विश्वामित्र प्रसन्न झाला थोर ।

महायोगी रामावरी ।।३२।। त्यास अस्त्रविद्या सकल शिकवित । जनकयज्ञीं होत उपस्थित । रामलक्ष्मणां समवेत । मुनि कौशिक तदनंतर ।।३३।। जनक त्याची पूजा करित । माहेश्वर धनूवर बाण लावित । श्रीराम तेव्हां ते मध्ये मोडत । जिंकला पण ऐशा रीतीं ।।३४।। तदनंतर जनक नृप देत । सीता श्रीरामाप्रत । ऊर्मिला अर्पिली लक्ष्मणाप्रत । सोहळा अपूर्व तो झाला ।।३५।। भावाच्या मुली तेव्हां अर्पित । एकेक भरत शत्रुघ्ना प्रत । नंतर अयोध्येस परतत । दशरथ नृप आनंदें ।।३६।। कैकेयी दशरथासी प्रार्थित । रामास पाठवा वनवासांत । राज्य द्यावें भरताप्रत । वरदान हें मागत मी ।।३७।। पूर्वी तुम्हीं वचन दिलें । तें पाहिजे आता पूर्ण केलें । दशरथें विवशपणें मान्य केलें । कैकेयीचें तें वचन ।।३८।। श्रीराम पितृआज्ञा मानित । सीता लक्ष्मणासह जात वनांत । प्रथम नाशिक क्षेत्रांत । निवास करी हर्षानें ।।३९।। तेथ अतिथिरूपें येत । लंकेचा रावण द्वेषयुक्त । एकाकिनी सीतेस पळवित । लंकेत घेऊन तिज गेला ।।४०।। राम लक्ष्मण जेव्हा आश्रमांत । परतले तेव्हां त्यास ज्ञात । सीता कोठेही न दिसत । राम मूर्च्छित जाहला तैं ।।४१।। नंतर जेव्हां सावध होत । तेव्हां विलाप बहु करित । सीतेच्या शोधार्थ जात । वनांतरी लक्ष्मणासह ।।४२।। कर्णाटांत शैवक्षेत्रांत । जेव्हां लक्ष्मणासंगे जात । तेव्हां शंभूस आराधित । भावभक्तीनें मास एक ।।४३।। संतुष्ट होऊन वर देत । सदाशिव रामासी मनोवांच्छित । सीताप्राप्तीसाठी उपदेशित । श्रीरामासी त्या वेळीं ।।४४।। ऐक रामा महाभागा वृत्तान्त । तूं सनातन विष्णु जगांत । भृगुशापें मानुष देहांत । अवतरलासी हें सत्य ।।४५।। सीता वियोगाचें दुःख तुजप्रत । झालें आता भक्तिसंयुत । गणराजासी भज निश्चित । तेणे होईल पूर्वज्ञान ।।४६।। रामा सीतेची होईल प्राप्ति । संशयातीत तुजप्रती । तें ऐकून

करी विनंती । राम परम शोकार्त ।।४७।। विनयें समन्वित प्रार्थित । शंभो महेशा सांगा वृत्तान्त । गणेशाचें स्वरूप काय असत । सर्वाधीश ज्यास म्हणती ।।४८।। रामाची प्रार्थना ऐकून । शंभु सांगे तयास पावन । गणेशयोग अतिप्रसन्न । मुनिसत्तमा त्या वेळीं ।।४९।। ऐक रामा सांगतों ज्ञान । जें ऐकता पावन । सर्वभावज्ञा शांति लाभून । कृतकृत्य तूं होशील ।।५०।। पंचधा बुद्धि हृदयीं संस्थित । जी चित्तरूप हे महाभागा असत । ती त्याचीच प्रकृति जगांत । ऐसें रहस्य जाणावें ।।५१।। नाना भ्रमकरी माया दिसत । सिद्धि ती मोहक जनांप्रत । सिद्धिप्राप्तीस्तव प्रयत । सर्वलोक सर्वकाळ ।।५२।। ती त्याची प्रकृति वर्णित । डाव्या बाजूस सिद्धि संस्थित । उजव्या बाजूस बुद्धि वर्तत । माया ऐसें तिज म्हणती ।।५३।। त्यांचा स्वामी गणेश ख्यात । योगशांतिमय मत । जाणून त्यास आम्हां प्राप्त । शांति सदा जगतांत ।।५४।। बुद्धीने तो जाणला जात । तेंच त्याचें रूप असत । योगादि साधनांनी न लाभत । तें सिद्धिज जाणावें ।।५५।। द्विविध माया सोडून । करी तूं गणनायकाचें पूजन । त्यानें तूं योगमार्गज्ञ होऊन । गणेशरूप होशील ।।५६।। वेदवादी त्यास वर्णिती । विघ्नराज नामें स्तविती । त्याचा अनादर जे करिती । विघ्नहीन तो कैसा होय? ।।५७।। त्याच्या अधीन विघ्नें असत । म्हणोनि तो विघ्नसंयुक्त । तैसाचि विघ्नहीन ख्यात । प्रभाववान जगामध्यें ।।५८।। विघ्नें सत्तात्मक असती । त्यांचा स्वामी गणपति । गणेश्वरा त्या विधिवत् भजती । ते होती विघ्नहीन ।।५९।। हेरंबा त्या भक्तिभावें भजावें । भक्तिमार्गाचें रूप जाणावें । तेणें तुज गणेशदेव स्वभावें । लाभेल हे निःसंशय ।।६०।। जेव्हां मानव स्वसत्ताहीन । तेव्हां त्यास म्हणती पराधीन । दीनांचे जे रक्षक महान । ते ईश्वर परमेश्वर ।।६१।। दीनांचे ते पालक असत । दीनार्थवाचक राम ख्यात । हें शब्दें ज्ञात वेदान्त ।

रंब म्हणजे नाथ जाण ।।६२।। त्यांच्या संयोगें हेरंब म्हणत । दीन सत्ताहीन जे असत । तैसेचि जे सत्तायुक्त । त्यांचा स्वामी हेरंब ।।६३।। त्यास विधानपूर्वक भजून । द्विविध अभिमान त्यागून । राघवा पूर्णपालनात्मक अभिमान । दीनात्मक हाही भ्रम ।।६४।। ज्यानें जीव केले दीन । परमेश्वर पालक पावन । जगद् ब्रह्म त्याच्या अधीन । त्यासी शरण तूं जाई ।।६५।। ऐसें सांगून महादेव क्षणांत । राघवा लक्ष्मणांसी रहस्य अद्भुत । अंतर्धान तो पावत । राघव तेथेंचि राहिला ।।६६।। विद्याधीश पुरांत । राम उत्तम तप आचरित । शिवोपदिष्टें मंत्रें तोषवित । विघ्नपा त्या हेरंबासी ।।६७।। हेरंबासी राम लक्ष्मण पूजिती । निराहार भावभक्ति । त्याच्या ध्यानें होत प्राप्ति । शांती त्यास स्वल्पकाळें ।।६८।। योगसेवेनें राम पूजित । जाणूनि त्याचा निश्चय प्रकटत । सहा महिन्यांनी प्रसन्नचित्त । करुणानिधी वर देण्यासी ।।६९।। रामास लक्ष्मणासहित । विघ्नप तेव्हां जागें करित । तेव्हां ध्यान सोडून नमित । गणपासी ते भक्तिभावें ।।७०।। हे मुने तेव्हां पूजित । राम विघ्नपासी स्तवित । गणाधीशा प्रणाम करित । भक्तिनम्र नतमस्तक ।।७१।। राम गणपतीचें स्तवन करित । हेरंबा मी तुज नमित । दीनकर्त्या कृपालवा विनीत । दीनानाथ स्वरूपकरासी ।।७२।।ईश्वरादीसी अभेदमयासी । विघ्नेशासी गणपतीसी । अनादीसी सर्वादिरूपासी । लंबोदरासी नमन असो ।।७३।। अंतमध्य प्रतिष्ठितासी । चिंतामणीसी चित्त पालकासी । भेदाभेदादि हीनासी । तदाकारासी नमन असो ।।७४।। सर्वपूज्यासी सर्वादिपूज्यासी । परमात्म्यासी अनंतासी । परेशासी ढुंढिराजासी । पूर्णासी पूर्णनाथा नमन ।।७५।। स्वानंदस्थासी । सिद्धिबुद्धि प्रदात्यासी । सिद्धिबुद्धि वरासी । भक्तिहीना दैन्यदात्या नमन ।।७६।। दीनां भक्तियुक्तां सामर्थ्यदात्यासी । दीनत्व सामर्थ्य ईशासी । सर्वाधीना

योगेशा तुजसी । किती स्तवूं मी अल्पमति ।।७७।। वेदादी तैसे योगीन्द्र न शकती । तुझी कराया पूर्ण स्तुति । तेथ काय माझी मति । तुझ्या वर्णनीं गणाधीशा ।।७८।। शांतियोग स्वरूपा तुज नमन । ऐसें करिता गणेशवर्णन । रोमांच शरीरीं दाटून । कंठ दाटला रामाचा ।।७९।। तेव्हां भक्तिरसांत मग्न । त्यास पाहे गजानन । म्हणे वर माग जो वांच्छी मन । देईन तो मी प्रसन्न ।।८०।। तूं रचिलेले स्तोत्र होईल । मजला हितकर विमल । शांतियोगप्रद अमल । भक्तिलक्षण वर्धक ।।८१।। ह्या स्तोत्राचा पाठ करित । त्यास सर्व लाभेल ईप्सित । ह्या श्रवणे भक्त होत । माझा प्रिय जगतांत ।।८२।। हेरंबाचें ऐकून वचन । त्यास म्हणे जनार्दन । परमभावयुक्त प्रसन्न । भक्तीनें ओंजळ जोडून ।।८३।। जरी गजानना तूं प्रसन्न । तरी तव पदकमलीं पावन । देई शाश्वत भक्ति मजलागुन । योगींद्रवंद्य करी मला ।।८४।। योगशांति तैशी स्मृति । शंकरें सांगितलें जें मजप्रती । तें तें मज द्यावें जगतीं । गणपति तूं महाप्रभु ।।८५।। रावणें हरण केली सीता । त्याच्या वधार्थ मी जातां । मिळावा जय मजला तत्त्वतां । ऐसें करी हेरंबा ।।८६।। माझ्या नावाचें महिमान । महा अद्भुत जगतीं पावन । सर्वत्र करावें मान्य प्रसन्न । मजला कीर्ति लाभावी ।।८७।। ऐसें त्याचे ऐकून वचन । रामास म्हणे गजानन । जें जें प्रार्थिले विष्णो मनोमन । तें तें सर्व तुज लाभेल ।।८८।। माझ्या स्मरणमात्रें होईल । सुलभ सर्व तुज निर्मल । तुझ्या नामप्रभावें तरतील । प्राणिमात्र जगतांत ।।८९।। ऐसें वरदान देऊन । गणेश पावला अन्तर्धान । रामलक्ष्मण भक्तियुक्तमन । तेथेंचि राहिले आनंदें ।।९०।। नंतर अगस्त्यासी बोलावित । विपेंद्रसत्तमांसहित । मूर्ति हेरंबाची स्थापित । विधिपूर्वक श्रीराम ।।९१।। तो आदि गणनाथ संस्थित । हेरंब विद्याधीश पुरात । मार्कंडेया

भक्तांप्रत । सर्व सिद्धि प्रदाता जो ।।९२।। त्यास पुजून राम होत । शोकहीन सीताविरहांत । लक्ष्मणासहित तैं जात । राक्षसांचा वध करण्या ।।९३।। सुग्रीवाशी मैत्री करून । दुष्ट वालीस मारून । वानरांसहित बलवान । लंकानगरींत राम जाई ।।९४।। हनूमंत अंगदादींनी संवृत । सुग्रीव जांबवंतांसहित । देवरूप वानरांच्या समवेत । लक्ष्मणासह राम लढे ।।९५।। राक्षस संघाते मारून । कुंभकर्णाचें केलें हनन । इंद्रजितासी मारी लक्ष्मण । रामरावणांचे युद्ध चाले ।।९६।। अति कोपयुक्त लढत । रावण पराक्रम गाजवित । अनेक कपींद्र झाले हत । पडले मूर्च्छित कितेक ।।९७।। लक्ष्मण पडला मूर्च्छित । रामही अत्यंत पीडायुक्त । रामाची शस्त्रास्त्रें कुंठित । विशेषें तेव्हां जाहली ।।९८।। तेव्हां अति विव्हल स्मरे राम । गणनायक अभिराम । स्मरणमात्रें गजानन । रामहृदयीं प्रकटला ।।९९।। चिंतामणि स्वयं देत । तेव्हां स्फूर्ति रामाप्रत । त्यायोगें तो रावणा मारित । मार्कंडेया अनायासें ।।१००।। स्वयें श्रीबुद्धिपति होत । बुद्धिदाता रामाप्रत । बुद्धि अधीन जगद्ब्रह्म असत । विशेषाने महामुने ।।१०१।। महावीर रावणासी मारून । बिभीषणा लंकाधीश करुन । सीतेसहित विमानीं बसून । अयोध्येसी परतला ।।१०२।। धर्मनीति राज्य करित । सीतासक्त त्याचें चित्त । ज्ञान विसरता होत । सीताविरहदुःख पूर्वीं ।।१०३।। परी आता अश्वमेधादि करून । राज्य करी धर्मयुक्तमन । वसिष्ठांच्या योगें ज्ञान । पुनरपि झालें रामासी ।।१०४।। नंतर शांति संयुक्त । मनीं गणेशासी ध्यात । भक्तिभावें त्यास पूजित । बाह्यात्कार धारका त्या ।।१०५।। अंती राम वैकुंठा जात । विष्णु तो अव्यय अव्यक्त । अनन्यभावें गणेशा भजत । सर्वकाळ स्वचित्तानें ।।१०६।। जो हें रामचरित वाचित । किंवा भक्तिभावें ऐकत । त्यासी मुक्तिलाभ होत । ऐसें रहस्य जाणावें ।।१०७।। हा

महोदराचा अवतार । हेरंबाख्य कथिला समग्र । महामुने ऐकतां सत्वर । सर्वसिद्धि लाभती ।।१०८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते रामचंद्रचरितं नाम षड्विंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सव्वीसांवा संपूर्ण)

ॐ श्रीगणेशाय नम: । नरनारायण मार्कंडेया सांगती । ऐसे हें राममाहात्म्य जगतीं । शक्ति होतसे कुंठित गति । मायामय हें सर्व जाण जगतीं ।।१।। ब्रह्मदेव ज्यासी निर्मित । विष्णु ज्याचे पालन करित । शिवशंकर संहार करित । मायाविरचित तें ब्रह्मांड ।।२।। ऐसी ब्रह्मांडें अनंत । सर्वत्र स्थित विश्रांत । महाकारण रूपें धारण करित । ऐसे जाण तूं मानदा ।।३।। मायात्मक ही सर्व असतीं । विशेषयुक्त जाणावीं तीं । भ्रमनाशकर योगें मति । जाण हें रहस्य नि:संशय ।।४।। मनोवाणीमय भ्रमरूप असत । मनोवाणी विहीन समस्त । भ्रमरूप हेही सर्व वर्तत । एकाचीच रूपें दोन्ही ।।५।। धर्म, अर्थ, काम, मोक्ष । ब्रह्मभूतत्वाची साक्ष । भ्रमकारक मायापक्ष । योग्यांच्या हृदयीं भासतसे ।।६।। रामाचें पूर्ण चरित । सांगितलें तुज संक्षेपयुत । प्राज्ञा, अजुनी ऐकण्या इच्छित । काय चित्त तुझें सांग ।।७।। आतां जाऊं निजाश्रमांत । ऐसें नरनारायण सांगत । तेव्हां मार्कंडेय काय म्हणत । ते सांगे सूर्य वालखिल्यांसी ।।८।। प्रणत होऊन विनवित । नरनारायणांनो पावन केलेंत । अमृतासम कथा सांगितल्यात पुनीत । तरीही तृप्ति ना झाली ।।९।। म्हणोनी गणेशयोग मज सांगावा । जो जाणतां मज साधावा । रामासम शांतियोगाचा आश्रय बरवा । ब्रह्मभूत मी व्हावें ।।१०।। तेव्हां नरनारायण सांगत । गणेशयोगमार्ग उचित । जो वर्णावया नसत ।

संपूर्ण शक्ति आम्हांजवळी ।।११।। चित्त पंचविध असत । तेथ चिंतामणि निवसत । तो पंचवृत्ति निरोधें लाभत । यात नसे संशय ।।१२।। भ्रांतिदा सर्व भावांत । सिद्धि सर्वत्र संस्थित । भ्रांतिधारकरूपा असत । बुद्धि ऐसें बुध म्हणती ।।१३।। त्यांचे बिंब जें उक्त । तोच गणनायक जगांत । स्वभावें खेळतो मोहयुक्त । मुनि सत्तमा हें जाण ।।१४।। बिंबिभाव सोडून । तूं व्हावेंस गजानन । 'मी गणेश असे महान' । हा योगविचार शांतिप्रद ।।१५।। पंचविध चित्त त्यागून । त्याचें भ्रमात्मक ऐश्वर्य नंतर सोडून । योगाचा आश्रय घेऊन । गणनाथ तूं होशील ।।१६।। मनोवाणीमय सर्व असत । गकाराक्षरें व्यक्त । मनोवाणीविहीन वर्तत । 'ण'कारानें अभिव्यक्त ।।१७।। त्यांचा स्वामी गणेशान असत । ऐसें महामुने वेद सांगत । त्यास भज तूं अविरत । तेणें शांतिलाभ तुज होईल ।।१८।। ऐसें सांगून वालखिल्यांनो थांबत । नरनारायण अन्तीं म्हणत । त्या गणनायका जाणावें समुचित । तेव्हां म्हणे मार्कंडेय ।।१९।। प्रणाम करी मीं प्रतापवंत । धन्य मी आपुल्या दर्शनें जगांत । मोहकरी माया जी शाश्वत । पाहण्या तिज इच्छितसे ।।२०।। भगवंतांनो करितों प्रणाम । महामायेचें घडवावें दर्शन । भानू सांगे वर्तमान । नरनारायणें तें मानिलें ।।२१।। मार्कंडेया पुढें महामाया पाहशील । चित्त तुझें होईल निर्मल । हें ऐकता पूजी अमल । योगींद्रांसी मार्कंडेय ।।२२।। नंतर ते गाणपत्य परतत । महर्षि आपुल्या आश्रमाप्रत । पुढें एकदा आश्रमांत । होता मार्कंडेय संस्थित ।।२३।। त्या नरनारयणांसी ध्यात । महायोग्यांसी मनीं प्रार्थित । मायादर्शनाची लालसा चित्तांत । उत्कट होती तयाच्या ।।२४।। तेव्हां महानाद तो अकस्मात । ऐकून झाला भयभ्रांत । मेघगर्जना भयंकर होत । वृष्टि झाली अनिवार ।।२५।। हत्तीच्या सोंडेसम धारा वर्षत । सर्व जगा करिती मज्जित । सागर जणूं अन्य हेलावत । चराचरा

गिळावया ।।२६।। मासे जलचर अन्य पसरती । मार्कंडेया किंचित् क्षती । पोचता स्मरे गणनाथा चित्तीं । तेव्हां एक शिशू दिसला ।।२७।। वटपत्रावरी होता स्थित । अंगुष्ठपर्व मात्र आकार असत । सर्व अर्थप्रद विष्णु प्रकटत । त्या रूपानें त्या समयी ।।२८।। त्यास प्रणाम करून स्तवित । मार्कंडेय महर्षि विनीत । अथर्वशीर्ष जपून करित । संतुष्ट त्या देवासी ।।२९।। त्या विप्रेन्द्रा देव विचारित । काय इच्छिसी मुने चित्तांत । सांग मी तें देईन निश्चित । वरदान आज मी तुला ।।३०।। त्यास प्रणाम करित । मार्कंडेय म्हणे प्रसन्न चित्त । तुझी माया मजप्रत । दाखवी विष्णुदेवा आतां ।।३१।। ती माया जाणून । रूप तिचें पाहून । मी तिजला त्यागीन । ऐसी इच्छा मनीं असे ।।३२।। तेव्हां विष्णु बालरूपांत । त्याच्या भक्तीनें जित । म्हणे हास्यसंयुक्त । भक्तरक्षणीं जो तत्पर ।।३३।। बालविष्णु मार्कंडेया सांगत । ज्ञानदृष्टि देतों तुजप्रत । तिनें महामुने सांप्रत । पहा माझी माया तूं ।।३४।। मार्कंडेय चक्षुसमन्वित । मायेसी तेव्हां पाहत । नाना भाव प्रकाशिता समस्त । आनंदाने त्या वेळीं ।।३५।। व्याप्यव्यापक रूपें संस्थित । नाना गुणभेदें नरांसी मोहवित । कोठे ब्रह्मांडनाश होत । कोठे ब्रह्मांड पालन ।।३६।। कोठें त्या योगें उत्पत्ती । कोठें शून्यमय स्थिति । अन्यत्र पूर्णरूपाची पुन्हां प्राप्ती । ऐसी माया पाहिली ।।३७।। ध्यानसंस्थ परब्रह्म पाहत । मुनिसत्तम माया प्रभावयुत । कोठे योगार्थ अत्यंत । लोक परम भाविक ।।३८।। कोठें भोगार्थ होते लिप्त । कोठें मोक्षार्थ यत्न करित । पुन:पुन्हा निर्माण होत । पुन:पुन्हा मरती ते ।।३९।। ईश्वर कोणी अनीश्वर कोणी । ऐसे नर पाहिले झणीं । अमृत विषरूप एक त्या क्षणीं । विष होई अमृतदायक ।।४०।। तेथे सूर्य जाहला शीतळ । ऐसें आश्चर्य त्या वेळ । पाहतसे स्थळीं जळ । जळांत स्थळ नाना विकारी ।।४१।। मुक्त तैसा

बद्ध नर । पाहिला भ्रान्तिप्रद ईश्वर । म्हणोनी होऊन अनिवार । जगत् आणि जगदात्मा ।।४२।। तें सर्व पाहून विस्मित । नानाविध भाव समस्त । वर्णन करण्या असंभव असत । शतकोटी वर्षांतही ।।४३।। ऐसी माया पाहून विस्मित । बालविष्णूसी स्तवित । नाना स्तोत्रें म्हणत । प्रार्थना करीं मनोभावें ।।४४।। हरी रे माया घे परत । करी मजला पूर्ववत । तेव्हां पुन्हा आश्रमीं नेत । विष्णु त्याला त्याचिया ।।४५।। डोळे उघडून पाहत । आपणासी स्वआश्रमीं स्थित । स्वप्न पाहिलें अद्भुत । ऐसें वाटलें तयासी ।।४६।। स्वप्नांत जे प्राणी दिसती । जागे होता ते नष्ट होती । तैशापरी झाली स्थिती । मार्कंडेय मुनीची तैं ।।४७।। नव्हती वृष्टि नव्हता पूर । कुठलें सागरासम तें नीर । तेथ नव्हतें भय अनिवार । बालरूप विष्णु न दिसे ।।४८।। बालरूपधर विष्णूनें निर्मिली । ती माया तेथ सरली । वालखिल्यांनो त्या वेळीं । भ्रमात्मिका ती तो सोडी ।।४९।। माया सोडून गणेश भजनांत । सक्त होऊन उत्तम मंत्र जपत । नरनारायणें जो पुनीत । सांगितला होता तयासी ।।५०।। त्या विष्णूची उपासना करित । हेरंबमंत्रयोगें भक्तियुक्त । जो योग पूर्वी साधित । रामानें तो योग साधी ।।५१।। गाणपत्य स्वभावें होत । शांतियुक्त पूर्ण तो चित्तांत । अनन्य मनें भजत । गणनायका योगज्ञ तो ।।५२।। मार्कंडेय अन्तीं गणेश देहांत । भक्तीनें सायुज्य लाभत । ऐसे नानाविध विप्र संभवत । गणेशयोगीं निमग्न जे ।।५३।। हें मृकंडपुत्राचें चरित । जो वाचित किंवा ऐकत । त्यावरी कदापि न पडत । मायाबंधाचा प्रभाव ।।५४।। महोदर देव हेरंब नामें ख्यात । विद्याधीश पुरांत । भक्तिसिद्धिद तेथ वसत । म्हणोनि त्यासी मीं भजतों ।।५५।। भानू वालखिल्यांसी ऐसे सांगत । योगभावें समन्वित । त्यासी भजत मी भक्तियुक्त । गणेशयोग सिद्ध करून ।।५६।। ऐसें भानूचें

ऐकून वचन । वालखिल्य करिती नमन । विविध स्तोत्रें करिती स्तवन । तदा सूर्यनारायणाचें ।।५७।। मुद्गल सांगती दक्षाप्रत । कथाभाग हा पुनीत । कर जोडुनि वालखिल्य प्रार्थित । पुनरपि ते भानूसी ।।५८।। सर्वप्रिया देवा केलेंत । कृतकृत्य आम्हां जगतांत । यांत संशय कांही नसत । काय देऊं आम्हीं तुला? ।।५९।। महात्म्या तुज समर्पित । आमुचा देह भक्तिभाव युक्त । त्यानें तुष्ट हो चित्तांत । आमुचा स्वामी गुरु तूं ।।६०।। तदनंतर सर्व वालखिल्य पूजित । भानूसी ते प्रणाम करित । ज्ञान लाभून जाती वनांत । तपश्चर्या करण्यासी ।।६१।। यथायोग्य सारें आचरित । जें जें ऐकिलें सूर्योक्त । त्यायोगे ते सर्ववंद्य होत । गणेशयोगी विशेषें ।।६२।। हेरंबासी अविरत । ध्याती भजती अनन्यचित्त । योगशांति अंति लाभत । ऐसी कथा तयांची ।।६३।। महोदर कलात्मक हेरंबावतार । कथिला तुजसी सुखकर । दक्षा प्रजापाला सुंदर । नाना आख्यान समन्वित ।।६४।। ऐसे त्या हेरंबाचे अवतार । महोदरअंशें आश्चर्यकर । परम अद्भुत त्यांचे चरित्र । मानदा अशक्य वर्णावया ।।६५।। कोणीही न शके करण्या वर्णन । मी अल्प केलें कथन । दक्ष प्रजापते तुज जाणून । भक्ति प्रेम प्रेरित ।।६६।। सूर्य वालखिल्यांचा संवाद । परम अद्भुत ब्रह्मभूयप्रद । धर्मकाम अर्थ मोक्षप्रद । कथिला तुज जैसा मज स्मरला ।।६७।। हा संवाद सर्वसंपत्तिप्रद मोह नाशकर । प्रभावयुत समग्र । काय ऐकूं इच्छिसी मोक्षकर । अन्य तें आतां सांगावें ।।६८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे तृतीये खंडे महोदरचरिते सूर्यवालखिल्यसंवादसमाप्तिवर्णनं नाम सप्तविंशतितमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सत्तावीसांवा संपूर्ण)